


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






शेवटी
मित्रहो,
झाड
फांद्यांच्या
द्वारा
पसरतं
आपल्या
मोकळ्यात
कोठल्या
तरी
आंतरिक
ऊर्मीनं

मराठी
अभ्यास
परिषद
पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १४ : अंक ३
पावसाळा १९९६

त्याप्रमाणे
कविलेखकही
शब्दांच्या
वसाहती
वसवतात
स्वत:च्याच
भावात्मक
विस्ताराला
निवारा
देण्यासाठी

अनुक्रमणिका

**अनुक्रम**

संपादकीय/जगात मराठीचा प्रभाव/आशा मुंडले/१
इये भारती लेखनी कळा/उडुपी रा. अनंतमूर्ती अनु. श्यामला वनारसे/७
पदबंध विचार; स्वरूप, अंतःशिक्षा आणि त्याचे प्रमाणन
(काही पारिभाषिक संज्ञा आणि संकल्पना)/शैलेश सदाशिव पुंडलीक/२५
धन परक्याचे/भाषांतरकाराचे कर्तव्य आणि उत्तरदायित्वः
(शार्ल बोदलेरच्या 'ताब्लो परिझियाँ' च्या जर्मन भाषांतराची प्रस्तावना/मूळ लेखक : व्हॉल्टर बेन्यामिन, अनु. अनिकेत जावरे/ ३८
पुनर्भेट / दूरचित्रवाणी : भोगवट्यासाठी की शिणवट्यासाठी? / ४६
ज्याची त्याची प्रचीती/सामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून मराठी भाषेचा अभ्यास/वसुधा माने/५१
शब्दायन/'वारी' आणि 'दिंडी'/ नवीन काही/पंडित आवळीकर/५३
पुस्तक-परीक्षण/एक कसदार संशोधन/परीक्षित पुस्तक : शैलीशास्त्रज्ञ भामह/ले. वा.के.लेले/मानसन्मान प्रकाशन, पुणे १९९६/परीक्षण-लेखक : मोहन धडफळे/५५
मुखपृष्ठ : श्री. श्याम देशपांडे/ मुखपृष्ठावरील कविता मनोगत (कुसुमाग्रज) पाथेय या संग्रहातून

---

**प्रकाशन :** त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती :** कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक :** कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २१८७)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरण पृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नितयकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

**संपादक:**कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक:**मराठी अभ्यास परिषदेसाठी-मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ :** सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ पुणे २.

संपादकीय

# जगात मराठीचा प्रभाव

ऑक्टोबरच्या ७ आणि ८ तारखेला जेरुसलेम येथे जागतिक मराठी परिषदेचे चौथे अधिवेशन भरणार आहे. त्यानिमित्ताने असा विचार आला, की जगात मराठी खरोखरच एक प्रभावशाली भाषा आहे का? भारतात तिला किती महत्त्व आहे? महाराष्ट्रात तिचे खरे स्थान कोणते? आणि सर्वांत जवळचा प्रश्न म्हणजे, मराठी माणसांच्या घरात, त्यांच्या वैयक्तिक आयुष्यात तिची जागा कोणती आहे?

हे सर्व प्रश्न क्रमाक्रमाने पाहू या. पाण्यात दगड टाकला, की वलये हळूहळू विस्तारित होत जातात. जशी जशी ती मूळ जागेपासून दूर जातात, तशी अस्पष्ट होत जातात. पण ती सर्वच समकेंद्रित असतात. भाषेच्या महत्त्वाला हा न्याय जसाच्या तसा लागू पडतो का?

जगातली आजची सर्वांत प्रभावशाली भाषा आहे इंग्लिश. तिला हा दर्जा कसा प्राप्त झाला? थोडक्यात पाहू या. औद्योगिक क्रांती व व्यापारी वसाहतवाद यांतून युरोपातील प्रमुख भाषा जगभर पसरू लागल्या. व्यापारातून हळूहळू राजकीय साम्राज्यवाद दृढमूल झाला. फ्रेंच, डच, जर्मन, पोर्तुगीज यांसारख्या अनेक स्पर्धकांना मागे टाकून इंग्रजांनी ही बाजी जिंकली. राज्यकारभाराची भाषा, उच्च शिक्षणाची भाषा, राजसत्तेचा पाठिंबा असणारी भाषा, उच्चभ्रू वर्गात समावेश होण्यासाठी अनिवार्य भाषा, न्यायदानाची भाषा हे इंग्रजीचे स्थान स्वातंत्र्यपूर्व काळात आपल्याकडे होते. १९४७ नंतर हिंदी आपण राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारली; पण एकटी नाही. इंग्रजी -हिंदी जोडगोळी स्वीकारली.

पुढे भाषावार प्रांतरचना साधारणपणे अमलात आल्यावर मराठी महाराष्ट्राची राजभाषा बनली. मी साधारणपणे असे म्हणते, कारण आज सुद्धा जी राज्ये अस्तित्वात आहेत, त्या सर्वांमध्ये बहुभाषक लोक राहतात. प्रत्येक राज्यात एकच भाषा, प्रत्येक भाषेचे एकच राज्य, प्रत्येक भाषेसाठी स्वतंत्र राज्य-अशी परिस्थिती नाही. सर्वधर्मसमभाव या कल्पनेत जसा बराच वैचारिक गोंधळ आहे, तसाच सर्व-भाषासमभाव यातही आहे. सत्ताधारी आणि धोरण- ठरवे यांच्यांत अनेक अशास्त्रीय पूर्वग्रहही दिसतात.

मुळातच देशाचे एकजिनसी तुकडे पाडून राज्ये निर्माण केली, तर भारताचे राष्ट्रीयत्व धोक्यात येईल, का नाही, यावर प्रचंड आणि सकारण मतभेद आहेत. याबाबतीत निरपेक्ष भाषाशास्त्रज्ञ आणि मानववंशशास्त्रज्ञ यांचा सल्ला घ्यावा किंवा



अनुक्रमणिका

विचारविनिमय करावा, असा प्रयत्न पद्धतशीरपणे होत नाही. भाषाविषयक धोरण हे पूर्वग्रह, प्रॅगमॅटिझम (व्यवहारवाद, कामचलाऊ वृत्ती), राजकीय डावपेच, अंदाज-पंचे दाहोदर्से, गतानुगतिकता; आपल्या आवडत्या मताला पुष्टी देतील असे मनमिळाऊ तज्ज्ञ, विचारवंत यांनाच विचारणे अशा अनेक पॅरामीटर्सवर (परिमाणांवर) ठरते.

मग बिचाऱ्या मराठीचा जगात प्रभाव वाढणार तरी कसा? हौशे, नवशे आणि गवशे यांना घेऊन जगात दर दोन वर्षांनी मराठीच्या जत्रा भरवून ते खासच होणार नाही. तसे प्रयत्न करू नयेत, असे मी म्हणणार नाही. कारण पैसा जमवणे, धडपड करणे आणि मग आपापल्या इष्टमित्रांसह मौज करणे हे समाजजीवनाचे एक आवश्यक अंग आहे. साहित्यसंमेलन काय किंवा जागतिक परिषद काय, त्यांचे उत्सवी आणि प्रतीकात्मक महत्त्व आणि मूल्य नाकारता येणार नाही.

या प्रकारांचा आर्थिक कारभार पारदर्शी असावा, असे, फार तर, आपण बसल्या जागी चिंतू शकतो.

जगात मराठीला मान मिळण्यासाठी खरी गरज असेल, तर ती कशाने पूर्ण होईल? उत्कृष्ट मराठी वाङ्मयाचा अनुवाद जगातील विविध भाषांमधे होऊन, तेथील प्रमुख विद्यापीठांत मराठी हा विषय शिकवला जाऊन. भारताबाहेर राहणाऱ्या मराठी भाषकांनी परदेशांत राहून तेथील भाषा अवगत केलीच पाहिजे, पण जमेल तेवढा संपर्क स्वभाषेशी ठेवून, मराठीचा परिचय आपल्या दत्तक देशांतील लोकांनाही करून दिला पाहिजे.

त्याचप्रमाणे मराठी माणूस व्यापारात जगाच्या इतिहासात जसा मानाने चमकेल, तसे त्याला समजावून घेण्यासाठी नक्कीच त्याचे इतर भाषक सहकारी व स्पर्धक मराठी शिकून घेतील. पुण्यातील अनेक मोठ्या उद्योगांचे परभाषक मॅनेजिंग डायरेक्टर आणि चेअरमन आज मराठी शिकत आहेत, ते याचमुळे. जगाकडून भारताकडे वळू या. जी कारणे जगात प्रभाव वाढवतात, ती सर्व तर भारताला लागू आहेतच, शिवाय राजकीय क्षेत्रातला महाराष्ट्राचा प्रभाव किंवा त्यांचा अभाव ही पण बाजू अधिक म्हणून विचारात घ्यावी लागेल.

मुळामधे माणसाचा भाषेबद्दलचा निरोगी दृष्टिकोन हवा. हा लोकशिक्षणाचा भाग आहे. आपापल्या भाषेशी भावबंध असतातच. पण माणसाला जेवढ्या जास्त भाषा अवगत होतील, तेवढे त्याच्या मनाचे क्षितिज विस्तारित होते, हे विसरता कामा नये. भाषेवर प्रेम करायलाच हवे; पण भाषेबद्दल कडवट निष्ठा नको. मराठीखेरीज इतर काही कानांवर पडले वा शिकायची वेळ आली, तर लगेच अंगावर झुरळ पडल्यासारखे होता कामा नये. काही माणसे परभाषा ही 'परस्त्री' असल्यासारखी परकी मानतात व स्वतःला 'शुद्ध' समजतात. हा चक्क झापडबंद मामला आहे.

अखेर भाषा आहेत, त्या माणसांनी माणसांशी बोलावे, एकमेकांना समजावून घ्यावे, एकमेकांवर प्रेम करावे, प्रसंगी भांडावेही; पण मुद्द्यावरून गुद्द्यावर येऊ नये,

यासाठी आहेत. जेव्हा हे सांस्कृतिक भान ढळते, तेव्हाच दंगा, कत्तली, युद्धे असे संघर्ष जन्म घेतात; आणि मग चक्रवाढ गतीने भाषेचा उपयोग (किंवा खरे म्हणजे दुरुपयोग) वर्चस्व गाजवणे, हत्यार म्हणून वापरणे, इतरांबद्दल तुच्छता जोपासणे यांसाठी होऊ लागतो.

मराठीप्रेमींनी आपले प्रेम या दृष्टिकोनातून सतत पारखीत राहिले पाहिजे.

जग, भारत, महाराष्ट्र असे करता-करता आपण आता घरातल्या मराठीकडे वळू या. पण त्याआधी महाराष्ट्रात मराठीचे स्थान वाढवण्यासाठी काय करता येईल, तेही अगदी थोडक्यात पाहू या. सरकार काय करील? आपण पुढाकार घेऊन काय केले पाहिजे? भाषेचे स्थान म्हणजे वाङ्मयाचे स्थान हा समज सदोष आहे. वाङ्मय हा भाषाव्यवहारातला फक्त एक पैलू आहे. त्याचा जोमदारपणा आणि सकसपणा इतर भाषाव्यवहारांशी संबंधित आहे. लेखक काही आभाळातून स्वयंभू टपकत नाही. त्याची नाळ त्याच्या भाषक समाजाशी जोडलेली असते.

त्याचप्रमाणे भाषा शिकवणे म्हणजे उत्तम गद्यपद्य वेचे भाषा पुस्तकांतून घोटून घेणे नव्हे. भाषा शिकवणे म्हणजे भाषा वापरण्याचे कौशल्य विद्यार्थ्याला शिकवणे. लेखन, वाचन, श्रवण आणि बोलणे हे त्याचे चार पैलू. तसेच, भाषेचा माध्यम म्हणून इतर विषय शिकण्यासाठी वापर करता येणे हाही स्वतंत्र पैलू आहे. भाषेमधे स्वतंत्र निर्मिती करणे हा आणखी वेगळा पैलू. यामधे मात्र मुळात प्रतिभा हवी. शिकवून भर पडते. पण शून्यातून लेखक, नट घडवता येत नाही. मुळात ठिणगी हवी. शालेय शिक्षणाचा दर्जा सुधारण्यासाठी सरकार खूप काही करू शकेल. त्याचे चर्वितचर्वण मी इथे करत नाही. राज्यकारभारात मराठी वापरणे ही पण सरकारचीच जबाबदारी आहे.

मात्र मला स्वतःला ठामपणे असे वाटते, की ग्रंथपुरस्कार, बक्षिसे इत्यादी सरकारने देऊ नयेत. फक्त नवोदित लेखकांना प्रथम प्रकाशनासाठी अनुदान किंवा बिनव्याजी कर्ज अशा योजना सरकारने ठेवाव्या किंवा चांगली पुस्तके विकत घेऊन जिल्हा ग्रंथालयांना पुरवावी. पण ख्यातनाम लेखकांना वैयक्तिक पुरस्कार देण्याच्या भानगडीत पडू नये. राजदरबार आणि लोकशाही यांत फ़रक आहे.

प्रसार-माध्यमांसाठी आपण स्वायत्तता मानतो, मागतो. तीच गोष्ट वाङ्मय-व्यवहाराची. इथे हे सांगणे आवश्यक आहे, की हे मत मी वैयक्तिक म्हणून लिहीत आहे. मराठी अभ्यास परिषद या संस्थेचे किंवा 'भाषा आणि जीवन' या पत्रिकेचे हे अधिकृत मत आहे, असा निष्कर्ष काढू नये.

सन्मान लोकांनी किंवा स्वायत्त संस्थांनी उत्स्फूर्तपणे द्यावा. लेखकाचे खरे परीक्षक म्हणजे वाचकच. समीक्षक म्हणजे जाणकार वाचक. जरा जास्त तंत्रज्ञान असलेला वाचक, एवढेच. पण शासनाकडे हे काम देणे स्वायत्ततेला बाधक आहे, असे मला वाटते. असो.

आता शेवटी म्हणजे घराकडे वळू या. घरात आई, वडील आणि आजकाल सुखवस्तूंच्या घरी सांभाळणारे नोकर या सर्वांच्या मातृभाषेचा परिणाम घरातल्या





अनुक्रमणिका

भाषेवर होतो. भोवतालची वस्ती, बाजारहाटाची भाषा यांचाही परिणाम होतो. आई-बाप दोघेही एकमेकांत मराठी बोलले, तर मुलेही मराठी बोलतात. पण तसे नसेल, तर मुले बहुभाषक होतात. वाईट काहीच होत नाही.

भाषेच्या बाबतीत अभिनिवेशापेक्षा स्वाभाविकतेचे महत्त्व जास्त आहे. माझा मुद्दा थोडा अधिक स्पष्ट करण्यासाठी जरा इतिहासाकडे वळते आणि नंतर थांबते. इतिहासाकडे वळतानाही मी फक्त मराठीपासून सुरुवात न करता प्रथम भारताकडे व नंतर मराठीकडे पाहिले आहे. असे करण्याचे कारण विवेचनाच्या ओघात स्पष्ट होईल. थोडक्यात सांगायचे, तर मराठी ही इतर अनेक प्रादेशिक भाषांपैकी एक आहे. त्या भाषांशी तिच्या काही समस्या व बलस्थाने समान आहेत. काही भाग भाषेनुरूप वेगळा आहे.

प्रादेशिक भाषांच्या अभिवृद्धीत आज जो फरक दिसतो, तो त्या त्या भाषेतील चाललेल्या लोक-प्रयत्नांमुळे - उदाहरणार्थ, केरळ राज्य पूर्णपणे साक्षर आहे व तेथील मासिकांचा, पुस्तकांचा खप प्रचंड आहे. याचे श्रेय मल्याळम् बोलणाऱ्या माणसांनी एकत्र येऊन केलेल्या प्रयत्नांना आहे.

पुस्तके विकत घेऊन वाचा, अशी सक्ती शासन करू शकणार नाही. करूही नये. कदाचित पर्यावरण, वृक्षतोड, कागदनिर्मिती याचा विचार करून पुढे आपल्याला फक्त रीसायकल केलेला कागद आणि तो सुद्धा मुळात सस्टेनेबल फॉरेस्टस (पुनर्निमितिक्षम जंगल) यातून आलेलाच वापरावा लागेल. एक पुस्तक अनेकांनी वाचणेच मग योग्य ठरेल.

### इतिहासाचा मागोवा

भारताच्या इतिहासातले किती तरी प्रश्न अनेक वर्षे एकाच साचेबंद विचारसरणीत घुटमळत राहिलेले आहेत. प्रादेशिक भाषांचा दर्जा हा त्यांतलाच एक नमुना. प्रथम संस्कृत, नंतर पार्शियन आणि नंतर इंग्लिश यांच्या तुलनेत लोकभाषांना दुय्यम दर्जा दिला गेला. याची कारणे अर्थातच राजकीय होती. दक्षिण भारतात तर सामर्थ्यशाली अशा स्वतंत्र भाषासमूहाच्या अस्तित्वाला पूर्ण नाकारणे शक्य नसल्याने वारेमाप संस्कृत शब्द स्थानिक भाषांत वापरले जाऊ लागले.

लोकांच्या भाषेतच महत्त्वाचे धार्मिक आणि इतर विचार मांडण्याचा पहिला यशस्वी प्रयोग गौतम बुद्धाने केला. पाठोपाठ महावीरानेही तीच भूमिका स्वीकारली. पण दुर्दैवाने या प्रयोगांचा गाभा न समजल्याने संस्कृतऐवजी पाली किंवा अर्धमागधी वापरणे हे त्या त्या धर्माचे पंडित विद्वत्तेचे लक्षण मानू लागले; आणि नंतर म्हणजे वरील धर्मपंथांचा प्रचार आणि प्रसार मागे पडल्यावर पुन्हा संस्कृत ही प्रमुख धर्मभाषा ठरली. बौद्ध, जैन ग्रंथही संस्कृतमधे लिहिले गेले.

महाराष्ट्राचा विचार केला, तर मराठीची ध्वजा उचलून धरण्याचा आणि फडकवत ठेवण्याचा मान महानुभाव पंथाकडे जातो. त्यांचेच अनुकरण पुढे ज्ञानेश्वरांनीही केले.





अनुक्रमणिका

राजकीय दृष्ट्या पहिला प्रयत्न शिवाजी महाराजांनी केला. त्यांची दूरदृष्टी त्यातून दिसून येते. लोकांना राजा 'आपला' वाटावा, हा त्यांचा हेतू होता. पण पुढे पेशव्यांनी पहिल्या बाजीरावांचा अपवाद वगळता स्वतःला'उच्चभ्रू' समजतच कारभार केला. त्यानंतर स्वातंत्र्य मिळेपर्यंत 'इंग्लिश' स्वामिनी होती. आंध्र प्रदेशच्या पोट्टु श्रीरामलु यांनी प्राणांतिक उपोषण केल्यावर भावनेच्या भरात पंडित नेहरूंनी भाषावार प्रांतरचना मान्य करून टाकली. त्यामागे कोणताही दूरगामी सामाजिक विचार नव्हता. त्यामुळे ते प्रांत बनवण्याचे काम आजही अपुरे आहे व अनेक विवाद चालूच आहेच.

शिवाय आपल्या देशाचे राजकीय धोरण प्रथम इंग्लिश-हिंदी, नंतर प्रादेशिक भाषांतील काही निवडक भाषा ,असेच आहे. इंग्रजी व हिंदी यांत पहिला नंबर कोणाचा, हा प्रश्न दोघींचा दर्जा समान मानून सोडवला जातो. पण व्यवहारात इंग्रजीचेच वर्चस्व आहे. उदाहरणार्थ, सुप्रीम कोर्टात इंग्रजीच चालते.

प्रादेशिक भाषांचा विकास ही अशी अडथळ्यांची शर्यत आहे. लादला गेलेला दुय्यम दर्जा, त्यामुळे बोलण्यात - लिहिण्यात दिसणारा न्यूनगंड आणि त्याची तीव्र प्रतिक्रिया म्हणून काही थोड्या व्यक्तींच्या बोलण्यात व लिहिण्यात दिसणारा अभिमान आणि प्रसंगी दुरभिमान सुद्धा, ही मराठीची कहाणी.

कवी माधव ज्युलियन आणि स्वातंत्र्यवीर सावरकर हे दोघेही मराठीचे अभिमानी पण एकाची वृत्ती समावेशक , वर दुसऱ्याची 'शुद्धी' करणवादी. सामाजिक व्यवहारात, इतकेच नव्हे, तर रोटीबेटी व्यवहारातही अतिशय प्रगत भूमिका घेणारे सावरकर भाषेच्या बाबतीत सोवळे ओवळे पाळताना पाहून मला नेहमीच गंमत वाटत आलेली आहे. सुदैवाने सामान्य मराठी भाषक व लेखक अशा भूमिकांपासून अलिप्त राहून इमानाने मराठी बोलतो आणि लिहितो. त्याला/तिला जशी जमेल, तशी.

म्हणून आपल्याला बहिणाबाई चौधरींचे अर्थमधुर घरगुती मराठी लाभले आणि त्याचवेळी आपण अत्यंत तर्कनिष्ठ आणि नेमक्या अशा आगरकरांच्या मराठीचाही आस्वाद घेऊ शकतो. कधी-कधी तर मला वाटते, की मराठीचा प्रभाव लोकमानसावर कायम राहिला आहे आणि पुढेही राहील, याचे मुख्य आणि कदाचित एकमेव कारण म्हणजे, असे इमानाने मराठी वापरणारे लोक. आज अजून त्यांतले फक्त निम्मेच साक्षर आहेत. पण पुढे शंभर टक्के साक्षरता आली, तरीही हेच लोक मराठी जगवतील. ह्याचा अर्थ मराठीच्या अभिवृद्धीसाठीचे सर्व औपचारिक प्रयत्न सोडून द्यायचे ,असा मात्र मुळीच नाही. फक्त आपण त्या प्रयत्नांची मर्यादा ओळखली पाहिजे; आणि हेही समजून घेतले पाहिजे, की मराठी बोलणारे, लिहिणारे सर्वसामान्य लोक हा मुख्य सांस्कृतिक प्रवाह आहे. गाभा आहे. औपचारिक प्रयत्न कितीही केले आणि लोकांनीच मराठी नाकारली, तर ती जिवंत राहणार नाही. उदाहरणार्थ, संस्कृत अखेर लोकांनी नाकारल्यानेच मृतभाषा झाली. तिच्याबद्दलचे औपचारिक प्रयत्न तर आजही थांबलेले नाहीत. उदाहरणार्थ, आकाशवाणीवरील

संस्कृत बातम्या, हा एक प्रयत्नच आहे.

औपचारिक प्रयत्न आणि लोकांनी केलेला उत्स्फूर्त वापर यांची दिशा परस्परपूरक असेल, तर ते सोन्याहून पिवळे. दुर्दैवाने तसे होत नाही. कारण भाषिक धोरण ठरवणारे धुरीण काही विशिष्ट कल्पनांमध्ये अडकलेले दिसतात. ज्या प्रमाणात आधुनिक भाषाविज्ञानाचा उपयोग त्यांना करून घेता येईल, त्या प्रमाणात ते तो घेत नाहीत.

धुरीणांच्या काही भाषाविषयक समजुती असतात. धुरीण म्हणजे अर्थात मंत्री, नोकरशहा व त्यांच्या मर्जीतील तज्ज्ञ, विचारवंत वगैरे. त्या समजुतींनाच शास्त्रीय ज्ञान समजून धोरण ठरवले जाते.

धोरण बदलायचे झाले, तर आधी पायलट प्रॉजेक्ट (पथदर्शक प्रकल्प) करून, मूल्यमापन करून, नंतर व्यापक बदल करावा, एवढेही पथ्य पाळले जात नाही. त्यात पुन्हा दर पाच वर्षांनी नवा शिक्षण मंत्री, मग त्यांची नवी विटी, नवे राज्य करण्याची हौस. या सगळ्यांचे एक गाजलेले उदाहरण म्हणजे, खेर मंत्रीमंडळाचा इंग्रजी भाषेबद्दलचा निर्णय किंवा नुकताच झालेला व न्यायालयात न टिकलेला प्रत्येक शाळेत मराठी शिकवण्याचा आग्रह.

म्हणजे मराठी भाषा जर जगली असली, तर ती धोरणांमुळे नसून, धोरणांची तमा न बाळगता सामान्य माणसांनी केलेल्या मराठीवरील प्रेमामुळे, असे म्हणता येईल.

पण समजा, खरोखरच आपल्याला मराठीची अभिवृद्धी करायची आहे, तर मग कोणते धोरण स्वीकारावे लागेल? पहिली गोष्ट म्हणजे, मूलगामी उपाय आणि उत्सवी कार्यक्रम यांतला फरक ओळखला पाहिजे. चांगल्या पुस्तकांना पुरस्कार देणे, साहित्यसंमेलने भरवणे, जागतिक मराठी परिषदा भरवणे हे सर्व उत्सवी कार्यक्रम आहेत. यांचे मूल्य मुख्यत्वे प्रतीकात्मक आहे. थोड्याशा लोकांना भरपूर पैसा व कीर्ती देणाऱ्या उपक्रमांपेक्षा शासनाचा रोख अधिकांना अधिक संधी इकडे असला पाहिजे. मराठीमाध्यम शाळा सर्व ठिकाणी असणे, त्यांचा दर्जा उत्तम असणे, ह्या शाळांतून इंग्रजी व हिंदीचेही उत्तम ज्ञान मिळवणे हे झाले पाहिजे.

प्रेम करू म्हटल्याने होत नाही. तुकाराममहाराज म्हणतात, त्याप्रमाणे 'नलगे चंदना पुसावा परिमळ वनस्पतीमेळ हाकारूनी.........

अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी, लपविता खरे येत नाही.'

मराठी माणसांनी मराठी भाषा बोलली, ऐकली, लिहिली, वाचली आणि त्यात वाङ्मयनिर्मिती केली, तर ती जगेल. व्यापारात व राजकारणात ती शक्तिमान झाली, तर तिचा देशात व जगात प्रभाव वाढेल. 'उत्सवी उपक्रम' हे पुष्पगुच्छासारखे आहेत. शोभेचे, आल्हाददायक; पण फुले मुळात फुलतात 'ती झाडा'वरच, फुलझाडे जोपासण्याचे काम पुष्पगुच्छ करू शकणार नाहीत.

**आशा मुंडले.**



# इये भारती लेखनी कळा

मूळ लेखक : उडुपी रा. अनंतमूर्ति
अनुवादक : श्यामला वनारसे

माझ्या लहानपणी आजूबाजूला खरे वाघ वावरून जायला कमी करत नसत. तेव्हाची एक जुन्यातली जुनी आठवण आहे, गोठ्यातल्या गाईंची. एकेकीला चांगली लाडाकोडाची नावं होती. त्या दिवशी त्या गप्प होऊन नुसत्या थरथरत होत्या. त्यांच्या गळ्यातल्या बांबूच्या घंटांचा अवचित हालचालीनं होईल तेवढाच काय तो आवाज. आम्हांला काहीही ऐकू येण्यापूर्वीच त्यांना डरकाळी ऐकू यायची. नक्षत्रांकित स्तब्ध रात्र. आई तशा अंधारात धीरानं पाऊल घालून गोठ्याची दारं गच्च बांधून येई. येताना घराची कुरकुरणारी दारंही त्या अंधाराला बाहेर ठेवून घट्ट लावून घेई. वर नक्षत्रं, स्तब्ध रात्र, गच्च अंधार... जणू काही घराभोवतालच्या दाट रानातूनच येऊन घराला वेढून टाकणारा. आईला बिलगून आम्हीही चिडीचूप पडून राहत असू, कान ताणून ताणून ती डरकाळी मोठ्यांदा, जवळून तर ऐकू येत नाही ना, याचा कानोसा घेत. वडील बाहेरगावी जात. ते कुलकर्णी होते. त्यांना गावाच्या कामासाठी मोठ्या गावी जावं लागत असे. ते मोठं गाव तर मी कधीच पाहिलेलं नव्हतं. घरात आजोबा असत. तेच आमच्या नित्य सोबतीला असत. अशा वेळी ते आमच्या जवळ बसत आणि घराचे रक्षण करणारे मंत्र म्हणत. या मंत्रपाठानं घराभोवती भरलेपण येतं आणि साक्षात कालीमातेचं वाहन असणारा वाघदेखील ती मंत्ररेषा ओलांडून येऊ शकत नाही, अशी आपली त्या काळी श्रद्धा. आजोबांनी मला असे बरेच मंत्र शिकवले होते. हे मंत्र म्हटले, की वीज, गडगडाट, साप, श्वापदं यांचं भय नसे. मंत्र पुटपुटता पुटपुटता केव्हा झोप लागून जायची, ते कळायचं नाही. दुसऱ्या दिवशी जाग येईपर्यंत मंत्र विसरलेला असायचा, पण सारा वेळ तोच विषय. भाताच्या शेतावर काम करणाऱ्या गडीमाणसांना आम्हां ब्राह्मणांपेक्षा जास्त माहिती असे. तेही मग वाघांशी आमने सामने गाठी पडल्याच्या अनुभवाच्या गोष्टी सांगत. या गोष्टी अजबगजब तर वाटतच, पण दिलासाही देत. चार पायांचा वाघही दोन पायांच्या माणसाला भितो; आणि त्याच्या वाटेला आपण जात नाही, तोवर तो काही करत नाही, हे ज्ञान पदरात पडे, पण त्याचबरोबर वर्षाकाठीचं देवाचं देणं मात्र दिलं पाहिजे, हेही मनावर ठसत असे.

खरी गोष्टीवेल्हाळ होती, ती अब्बाक्का. हिला जुळी पोरं होती. दारच्या डाळिंबीच्या झाडाखाली बसून पोरांना पाजता पाजता अफाट गोष्टी सांगायची. या





अनुक्रमणिका

पोरांना काखोटीला मारून यायची आणि आईबरोबर अव्याहत गावगप्पा करत बसायची. आता या दोघींच्यांत जातीचा, दर्जाचा फरक खूप होता, पण बायकी गप्पांमध्ये त्याची कधी आडकाठी झाली नाही. 'मेला बायकांचा जल्म!' त्यातल्या दुःखांचा भार एकमेकीशी बोलून हलका होई. पण हे सगळं चालायचं मागीलदारी. ही मागीलदारची बोलणी पुढीलदारी चालणाऱ्या बोलण्यांपेक्षा नेहमीच वेगळी असत. मागीलदारचं बायकांचं अंगणच माझ्या आवडीचं होतं.

अब्बाक्का मला मोठी रहस्यमय वाटे. कधी-कधी तिन्हीसांजेच्या वेळी तिच्या अंगात येई. हातात सुपारीचे तुरे, केस मोकळे सोडलेले, मळवट भरलेल्या अवतारात ती घुमायची. स्वच्छ सारवण केलेलं, तेलपाणी केल्यानं चकाकणारे वासे असलेलं कौलारू घर आणि कोपिष्ट देवी अंगात येऊन घुमणारी अब्बाक्का. तिचे डोळे अर्धवट उघडे असत. या जगाचं तिला भान नसे. संमोहित अवस्थेत ती नाचायची. पायांशी लोळण घेणाऱ्या कोणाकडे तिनं बघितलं, की तिच्या नजरेनंच कापरं भरायची वेळ येई. पण तिच्या पाया पडणारे लोक तिचे कोपिष्ट बोल मुकाट्यानं ऐकून घेत, आणि तोडगा विचारीत. नवरा बाहेरख्याली आहे, सून नीट नांदत नाही, मुलगा बिघडून वाईट नादाला लागलाय्, गाय परतली नाही, अशा प्रापंचिक अडचणींबाबत तिचा सांगावा ऐकत. कोणी आजारपणाचं विचारलं, तर देवी नैवेद्याला कोंबडं मागत असे, औषधही सांगत असे.

आपली रोजची अब्बाक्का ती हीच का? असा मला प्रश्न पडे. ज्या डाळिंबाच्या झाडाखाली अब्बाक्का पोरांना पाजत बसे, ते झाड आजोबांच्या गोष्टीतलं तर नव्हे? त्याच तर झाडाखाली फळांची राखण करणारा राक्षस राहायचा, राजकन्येला तीच फळं खाण्याचे डोहाळे लागायचे, पण हंगाम तर नसायचा. मग उमदा, धाडसी राजपुत्र सातासमुद्रांपार जायला निघायचा... मग त्यालाच ती प्रेमळ चेहऱ्याची जादूगार म्हातारी भेटायची... हीच अब्बाक्का ना? आणि राजपुत्र म्हणजे तर अस्मादिकच नव्हते का? झोप लागता लागता कल्पिताची वास्तवाशी मिसळण होत राहायची.

रोज सकाळी आजोबा विळा घेऊन बाहेर पडत आणि घराभोवतीच्या झाडोऱ्यातून पाळंमुळं कापून टाकत. घराभोवतीच्या रानाचा सतत धाक होता. आजोबांनी रोजच्या रोज काळजी घेतली नाही, तर हे रान घरात घुसेल, असं सारखं वाटे; आणि पावसाळ्यात झड लागली, की व्हायचंही तसंच. हिरवी फूट अगदी घरापर्यंत पोचत असे.

घराभोवतीचं रान जितकं वास्तव होतं, तितकंच रहस्यमय होतं. तिथंच कुठल्या तरी जाळीत वाघ असत. पाचफड्यांचा नाग वावरत असे! त्याला पाहिला नव्हता कुणी, पण त्याची शीळ ऐकल्याचं एखादा सांगे. पुराणांमधले ऋषिमुनी युगानुयुग तप करत तिथंच ध्यानस्थ बसलेले असतील, त्यांच्या अंगावर वारुळं वाढली असतील. त्यांचं तप इतकं उग्र, त्यांचं आसन इतकं स्थिर, की त्यांच्या

जटांमधे पक्षी घरटी करतात, म्हणे. यांच तर अरण्यात राम वनवासाला आले. पांडव तर तिथल्या तळ्यात जलक्रीडेसाठी उतरले. आजोबाच सांगायचे,

'हे पान आहे ना, त्याची वात करून सीतामाई दिवा लावायची. आणि हे झांड आहे ना, त्याची फुलं केसांत माळायची. असे श्रीराम पुढं आणि सीतामाई मागं या इथून चालत गेले...

या रानात वास्तव आणि कल्पित एकजीव झालं होतं. एवढंच नव्हे , तर माझ्या लेखी परमदुःख आणि अद्‌भुत हर्षाच्या अनुभूतीही या रानाशीच निगडित होत्या

एका अपरात्री किर्र रानातल्या निरुंद वाटेवरून कोणी तरी कराकरा चपला वाजवत आलं आणि आमचं दार त्यानं ठोठावलं. माझा मामा दिवाळसणासाठी सासुरवाडीला गेला होता, तो तिकडेच निवर्तल्याची बातमी त्यांनी आणली होती. मी जागा झालो, तो आजोबांच्या तोंडच्या 'नारायणा' अशा उद्‌गारामुळं.

माझ्या आठवणीप्रमाणे ती कार्तिकातली रात्र होती. स्वच्छ आकाशात चमकणाऱ्या नक्षत्रांची. ही काळवार्ता आणणारे जसे आले, तसे त्याच अरण्याच्या पोटात गडप झाले.

नंतर आलेल्या दिवाळीत माझ्याशिवाय दुसऱ्या कोणीच अभ्यंग स्नान केलं नाही. सगळी मोठी माणसं (श्राद्धाला) जमली होती, शोक करीत होती, आजोबांनी दूषित पत्रिकेच्या मुलीशी मामाचं लग्न लावल्यावरून त्यांना बोल लावीत होती.

माझं अभ्यंगस्नान यथासांग झालं. चोळून मोळून अंग धुतलं, खसाखसा पुसून झालं. चंदनाच्या वासाचे ठेवणीतले कोरे कपडे आईनं चढवून दिले. ते घालताच मी अंगणात पळालो.

झुंजुमुंजू झालं असेल, नसेल. तेवढ्यात काय आश्चर्य! आकाशात मला एकदम दिव्य तेजोगोलांची उधळण होताना दिसली. दिसली, म्हणायचं का? मी आईला, आजोबांना हाका मारल्या. पण माझ्या सांगण्यावर त्या दोघांचाही विश्वास बसला नाही. ती दोघं एकमेकांशी फारशी बोलत नसत. आईनं तर मला दटावलंच.

'आत हो बघू. थंडी बाधेल अशानं.'

वर्षानुवर्ष ही गोष्ट माझ्या स्वप्नात येते. माझ्या बुद्धिनिष्ठ, शंकेखोर मनाला अजूनही या आठवणीनं अस्वस्थ वाटतं. माझ्या बुद्धीला काहीही वाटलं, तरी माझ्यातल्या लेखकाला हे क्षण टिपायची निकड असते, त्यांचे स्पष्ट, प्रत्ययकारी स्पर्श, गंध, रूप सारंच शब्दांत पकडावंसं वाटतं. जसं वय वाढत जातं, तसा काळाचा सरळमार्गी प्रवास म्हणजे अर्थहीन आठवणींचा ढिगाराच बनू लागतो, त्यांत या पकडलेल्या क्षणांनी अटकाव तर होत नसेल ना? आणि कोणी सांगावं? कधी आपल्या भाग्याने - फॉर्स्टर म्हणाला, त्याप्रमाणे - 'केवळ जुळलं', तर त्याच ठिकाणी बात पैदा होते!

माझ्या लेखनातून मी नेहमीच माझ्या बालपणाला सामोरा जाण्याचा प्रयत्न

करत असतो; पण या शाब्दिक अभिव्यक्तीच्या धडपडीत माझ्याच भूतकाळात रमणाऱ्या गतरंजनी दृष्टीमुळं मूळचा अनुभव सूक्ष्मपणे बदलतो का? हे सारं सांगत असताना आत्ताही तसंच काही घडत नाही ना? पण नाही तर वास्तवाचं रूपक कसं बनतं? रूपक झाल्यानंच भासमान प्रत्यक्षापेक्षा प्रतिमा प्रत्ययकारी होते ना! अशा वेळी तुम्हांला किलकिल्या डोळ्यांनी बघावं लागतं आणि खोलातलं बोलत आणायचं, तर जीभ अडखळत बोलावं लागतं. भारतीय काव्यशास्त्र तर मला सांगतं, 'ध्वनिरात्मा काव्यस्य' आणि वक्रोक्तीनंच हृदयसंवाद शक्य होतो.

गोष्ट सांगणं म्हणजे काळाच्या मितीवर मनःपूत आगे वा मागे संचार करणं आणि अशी मोकळीक घेऊन काळावर काबू मिळवणं. एरवी जे कायमचं हरवून गेलं असतं, त्याची पुनःस्थापना करणं. आपण व्यतीत केलेल्या काळाच्या सातत्याचं भान स्मृतीमुळं टिकून राहतं, हेच आपल्याला माणूसपण देतं. स्वभाषेतील साहित्यामुळं हे सातत्य व्यापकपणे जाणवू लागतं.

दहाव्या शतकातील पंप किंवा बाराव्या शतकातील बसव यांचं साहित्य मी वाचतो, तेव्हा शतकांची दरी पार करून त्यांचे विचार आणि जीवन माझ्यापर्यंत पोचतात आणि त्यांची सुखदुःखं माझिया जातीचीच असल्याची प्रचीती मला येते. मी तरी कोण? या स्वभाषेच्या प्रदीर्घ साखळीमधला दुवा. मात्र लेखक, सिद्धहस्त भाषाप्रभूंनी शतकानुशतक ज्या आस्थेनं या भाषेची शक्तिसाधना केली, निःशब्दाला उजळणारा नेमका शब्दशोध घेतला, त्या आस्थेचाच पाईक. माझी नित्य व्यवहाराची भाषा हे साधू शकते, कारण नित्यप्रत्यक्षाचं वर्णन करणाऱ्या शब्दांनाच रूपकात दाखल होण्याची ऊर्जा आहे. त्यामुळंच तर माझं बालपण तुमचंही होतं- हे प्रेमाचं दोघुलेपण -ही गाढ भागीदारी भाषेमुळंच शक्य होते.

काळावर मात म्हणजे मृत्यूवरही मात. हजार रात्री संपतात, गोष्ट संपत नाही. प्रत्येक सुरस आणि चमत्कारिक गोष्टीगणिक एकेका दिवसाचं जीवदान आणि पुन्हा एकवार उफाळणारी नियतीला जिंकण्याची आशा. शेवटी राजा शहाजादीच्या मोहात पडला आणि तिला मूल झालं! आपण मर्त्य नसतो, तर आपण गोष्टी सांगितल्या नसत्या आणि त्याबरोबरच हेही खरं, की आपल्याला अमरत्वाची ओढ नसती, तरीही आपण गोष्टी सांगितल्या नसत्या. आपण सगळेच प्रौढत्वीही थोडे शिशू असतोच; आणि शब्दांच्या गारुडाच्या जोरावर मरणाला तोंड देण्याची तयारी करत असतो. शब्दांनी आपल्याला बालपणीच अमरत्वाची झलक दाखवलेली असते. काळ एकदिक् आहेही आणि नाहीही, तो असा.

अशा प्रकारे विचार करता-करता तुम्ही राजकारणातही शिरू शकता - म्हणजे संतांचं, सर्जनशील लेखकांचं राजकारण - गांधी, मार्टिन ल्यूथर किंग, तॉल्स्तॉय यांच्यासारख्यांचं. हे राजकारण 'मानव तितुका एकच आहे' या घोषासाठी असतं. त्याची प्रेरणा इतर अनेक गोष्टींप्रमाणेच जन्ममृत्यूच्या रहस्यातून, सातत्याच्या

ध्यासातून आणि माणूस सहजवेध्य असल्यामुळंच माणसांनी एकमेकांचा सांभाळ केला पाहिजे, या जाणिवेतून येतं.

दुरात्मेही मर्त्य असतातच. स्तालीन किंवा हिटलर हे ही एकेकाळी असहाय अर्भकंच होते ना? ओझिमांडियासचं आज काय उरलं आहे? सर्व धर्मांचा उगम याच भावात्म जाणिवेतून होतो. सद्विचाराला प्रेमाविना दुसरं अधिष्ठान नाही. मृत्यू नसता, तर आपण प्रेम करू शकलो असतो का? धर्मच नव्हे, तर राजकारणही याच भावनेतून जन्म घेतं. आजच्या अस्वस्थ जगात धर्मभावनेप्रमाणेच राजकारणातील भावनिक तीव्रताही कार्यरत होऊ शकते आणि तिचाही उगम याच प्रेमातून होतो. प्रेम हा शब्द गैरवापरानं निकामी होऊ घातला आहे आणि तोच इथं वापरताना मला ओशाळल्यागत वाटतं आहे. त्यात आणि वर आधुनिक मनोविज्ञान आणि समाजविज्ञान ठासून सांगतात, की प्रेम आहे, याचा अर्थ द्वेष आहे, असा होतो, प्रेम एकटं लटकत नाही. पण मला वाटतं, प्रेम आणि राग ही जोड आहे, प्रेम आणि द्वेष नव्हे. तुमचे डोळे रागाप्रमाणेच अश्रूंनीही लाल होऊ शकतात. हेच खऱ्या क्रांतिकारकांचं आणि लेखकांचंही राजकारण होय.

हे सारं मांडता मांडता मी आता दुभंगलेल्या हितैक्याच्या अस्वस्थ प्रदेशात पाऊल टाकण्याचं धाडस करून बसलो आहे. आपण कथा सांगतो, तेच मुळी जे गमावलं, ते मिळवण्यासाठी. याविषयी बोलताना प्रथम मी आपल्या व्यक्तिगत अनुभवाच्या परिघात राहणंच श्रेयस्कर. जगभर चाललेल्या परस्परांचा नाश करणाऱ्या संघर्षाच्या क्षेत्रात शिरण्याआधी मला व्यक्तिशः लहानाचं मोठं होण्याचा हादरून टाकणारा झपाटा सोसण्यापायीच कथा सांगणं कसं प्राप्त झालं, हे सांगायला हवं. त्या मोठ्या रणधुमाळीत साहित्य ते कितीसा हात देणार, हा प्रश्न आहेच. शिवाय नाही तरी लेखकाला कोणतीही गोष्ट फक्त आतूनच दिसू शकते आणि मगच - तेही नशीब जोरावर असलं तर - तो मूर्त अनुभवाला प्रतीकाचं तेज देऊ शकतो.

चार मैलांची पायपीट करून शाळेत जाणारा पोरगा होतो, तेव्हाचं माझं गोष्टी सांगणं म्हणजे स्वतःचं महत्त्व पटवण्याच्या प्रयत्नाचाच भाग असणार! कथेमधल्या आपणच निर्मिलेल्या प्रसंगांचे आपणच नियंते असल्याची जाणीव मला नियतीची सत्ता भोगण्याचं समाधान देत असणार! अशा प्रकारची कुठलीही उपजत देणगी, मला वाटतं, खूप व्यामिश्र आणि बव्हर्थी असते. आपल्यापैकी बहुतेक जण लेखणी उचलतात, तेच मुळी आपण कोणी तरी विशेष व्हावं, या आकांक्षेमुळं. आपण बुजरे असतो. स्वतःच्या नगण्यतेची जाणीव होत असते, म्हणून तर दखलपात्र होण्याची आस बाळगून असतो. असाच काहीसा प्रकार माणसाचा हुकुमशहा बनायला कारणीभूत होतो, नाही का? असो. पण गंमत अशी, की बहिर्मुख वृत्तीनं धिटाई दाखवू शकणाऱ्यांचं कौतुक होतं आणि त्यांच्याबद्दल कितीही तुच्छताभाव वाटत असला, तरी त्यांच्या अंगच्या आत्मविश्वासाला खतपाणी घालणाऱ्या जीवनशक्तीबद्दल त्यांचा

हेवा वाटल्यावाचून राहत नाही. मग आपण आपल्या दिवास्वप्नांच्या दुनियेत मशगूल होतो आणि या बंदिस्त दुनियेला आपण गजबजून सोडतो, ते आपल्या हुकमाचे बंदे असणाऱ्या शब्दांनी. एखादा उड्या ठोकणारा, छलांग टाकणारा, धाव मारणारा, पोहणारा, झाडाच्या पार शेंड्यावर चढून बसणारा मुलगा थेट गुरुत्वाकर्षण, काळ यांसारख्या अपरिवर्तनीय निसर्ग-नियमांनाच आव्हान देत असतो. आम्ही कथाकार मंडळी तेच आव्हान आपल्या दिवास्वप्नांच्या जगात शब्दांच्या साहाय्यानं उभं करीत असतो. ही खरी तर चलाखीच असते; पण नशिबानं ते कधी चतुर शहाणपणही ठरतं.

सुरुवातीला हे सारं कसं बिनबोभाट चालतं. अद्‌भुतरम्यतेच्या नादात माळ्यावर पडलेल्या जुन्यापुराण्या, पानं पिवळी पडलेला पुस्तकांच्या जोरावर उडत्या घोड्यावर स्वार होता येतं. पण असं किती काळ चालणार? त्यातून अस्मादिक एका खऱ्याखुऱ्या मुलीच्या प्रेमात पडलो! तशी ती मला अप्राप्यच होती म्हणा! एक तर मी दुबळा काडी पैलवान आणि भरीस भर म्हणजे जातीनं ब्राह्मण. पण जातीची मला फारशी आडकाठी वाटत नव्हती. कारण एक तर खुद्द गांधीजींनीच आपल्या समाजातील सनातनी कल्पनांमधल्या दोषांवर बोट ठेवलं होतं. माझ्या आत्मसमर्थनाची आयतीच सोय झाली होती. गांधीजींचं नाव घेऊन मी माझ्या भावनांचं समर्थन करत होतो. आमच्या अग्रहारातील वडीलधाऱ्या मंडळींना गांधीजींच्या आचार-विचारांनी बुचकळ्यात टाकलं होतं, अस्वस्थ केलं होतं. पंचा नेसून वावरणारे गांधीजी देवमाणूस वाटत, हे तर नक्की - पण मग ते अशा वर्णसंकराच्या गोष्टी का उचलून धरतात? शास्त्रांपेक्षा काय त्यांना जास्त कळत होतं?

आपण कोणी विशेष आहोत, असं वाटण्यासाठी, इतर मुलांमधून वेगळं उठून दिसण्यासाठी पुढं पुढं मी नदीकाठच्या मठात जाऊन तिथल्या प्रयोजनांच्या वेळी जमणाऱ्या ब्रह्मवृंदांच्या विद्वत्तापूर्ण चर्चा उत्सुकतेनं ऐकू लागलो. माझी मुंज झाल्यावर मी कर्मठ ब्राम्हण बटू होण्याच्या मागे लागलो. त्या काळातला माझा आदर्श म्हणजे संस्कृत शिकवणारे गुरुजी. ते ब्रह्मचारी होते. मठात राहत. एकभुक्त असत. ब्राह्मण कुटुंबांतून मिळणाऱ्या भिक्षेवर उदरनिर्वाह करत. एरंडेलाचा दिवा कोनाड्यात ठेवून ते रात्री उशिरापर्यंत भूर्जपत्रावरच्या पोथ्यांचं वाचन करत. हा दिवा आपला आपण विझला, की ते थांबत. जास्त प्रकाशासाठी त्यांनी कधी वात सारली नाही. अपरिग्रहाचं तर त्यांनी अगदी टोक गाठलं होतं. वर्षाकाठी मिळणाऱ्या दोन धोतरजोड्यांखेरीज त्यांनी काहीही जवळ बाळगलेलं नव्हतं. एके दिवशी दुपारी मी त्यांच्यापाशी कालिदास वाचत होतो, तेव्हा एक चळ लागलेला म्हातारा उगवला. त्यांचं उत्तरीय वस्त्रच मागू लागला. त्यांना प्रश्न पडला, वापरलेलं वस्त्र कसं द्यावं? त्यांनी थोडे आढेवेढे घेतले, पण शेवटी अंगावर लपेटलेलं वस्त्र त्यांनी देऊन टाकलं. उरलेला सगळा हिवाळा त्यांनी उघड्या अंगानं काढला. पुढची जोडी मिळेस्तोवर चैत्र उजाडायचा होता. या प्रसंगामुळं मी मुळापासून हेलावलो. मला आठवतं, नदीच्या पात्रातील वाळवंटावर





अनुक्रमणिका

पडल्या-पडल्या माझ्या मनातील हीन विचार-विकारांबद्दल आत्यंतिक पापभावना आणि शरम अनुभवण्याचा मी प्रयत्न करत असे. गुराख्यांच्या निकोप आणि दणकट पोरांचं खुलं कामजीवन दृष्टीस पडे. 'तसं' सर्व काही ब्रह्मचर्यामुळं नाकारावं लागतं. याबद्दल तीव्र असूयाही तडफड वाढवी. हातांवर आणि कपाळावर गोंदण काढलेल्या एका कोळणीच्या मी प्रेमात पडलो होतो. ती माझी शकुंतलाच होती. माझ्या नैष्ठिक ब्रह्मचारी गुरुजींसमोर बसून शाकुंतल वाचताना मला तीच दिसत असे. पण ते जरी चेहऱ्यावरची सुरकुतीही न हलवता ती सर्व प्रणयवर्णनं कशी काय शिकवू शकत, देव जाणे! जणू काही ते सारे शब्द म्हणजे अन्वय आणि व्याकरण यांच्यानुसार लावण्यासाठी फिरवण्यापुरतेच अस्तित्वात होते! आणि मी तरी असा मुखदुर्बळ, की त्या चाफी माळणाऱ्या आणि कमरेवरच्या करंडीत मासळी नेणाऱ्या सावळ्या मुलीशी भाषण सुद्धा केलं नव्हतं. तिची त्रिभंग चाल म्हणजे नृत्यच होतं.

नाही - अशी पापभावना वाटून घेणं, शरमेनं चूर होणं ह्या सगळ्या गोष्टी म्हणजे मोक्षसाधनेची पहिली पायरी मानणं हे सुद्धा बहुतेक नाटकच असावं - कारण त्यातही मी कुणी वेगळा, विशेष आहे, हे सिद्ध करण्याचा खटाटोप होताच. मला त्याची जाणीव होती. मला संवेदनशीलता अगदी तरल करून घ्यायची होती. त्या हळव्या 'मी' ची सगळी खळबळ एका दैनंदिनीत लिहून काढत होतो. पल्लेदार वाक्यं, भाषेचा फुलोरा - अगदी रेलचेल असायची. कारण माझं मलाच नेमकं काय छळतं आहे. ते कळत नव्हतं, स्पष्ट सांगता येत नव्हतं. बाकीची मुलं खुशाल आपल्या शारीर सुखाच्या गुप्त बातम्या जाहीर करत. पण तो धीर माझ्याजवळ नसल्यानं मला शब्दांची गरज पडे. तेव्हा शब्दांनी मी मोहित झालो, तेच मुळी त्यांच्या अव्यक्ताला व्यक्त करण्याच्या शक्तीपेक्षा त्यांच्याआड लपता येतं म्हणून. हा भाषेचा गुण लेखकांना नेहमीच मोहात पाडतो, की नाही? असा मोह म्हणजे, लेखकी पेशाचा अंगभूत भागच म्हणावा लागेल! जेव्हा तुम्ही थोडे प्रसिद्ध होता. प्रसिद्धीमुळं आदरणीय - म्हणजेच जखडलेले - म्हणा, हवे तर - सार्वजनिक व्यक्ती बनता, तेव्हा तर हा मोह टाळू म्हणता टळत नाही.

या काळातला माझा 'हीरो' ब्रह्मचारी मला कधी काष्ठवत्, तर कधी तपःपूत चैतन्यमूर्ती वाटे. पुढं गुरुजींनी अन्नग्रहण कमी करत नेलं आणि एक दिवस जेव्हा 'बोलावणं' आलं तेव्हा ते पायीच हिमालयाच्या दिशेनं अंतिम यात्रेला गेले. बोधिवृक्षाच्या पानाचा कौल घेऊन त्यांनी हा निर्णय घेतला.

गुरुजींखेरीज माझ्या वडिलांचाही माझ्यावर त्या काळात प्रभाव होता. माझ्या त्या संस्कारक्षम वयात धर्मपरायणतेपासून निव्वळ भटकंतीकडे लंबकासारखे हेलकावे खात वडिलांचं आयुष्य चाललं होतं. मालकीचे आणि वसुलीचे न संपणारे कज्जे लढवण्यासाठी ते कोर्टात जात ते जमीनमालकांच्या बाजूनं. पण येताना तेच गांधीजींच्या 'हरिजन' पत्राच्या प्रतीही घेऊन येत आणि अग्रहारातल्या सर्वांना कळण्यासाठी त्यातील संदेश कानडीतून सांगत. माझ्या वडिलांचं व्यक्तिमत्त्व

अशांसारख्या अंतर्विरोधांनी ओतप्रोत होतं. त्यांचं सर्व ज्ञान अक्षरशः स्वाध्यायाचं होतं. भिक्षुक होण्याचं त्यांनी टाकलं, स्वतः अभ्यास करून अनेक परीक्षा दिल्या, गणित, गणितज्योतिष आणि फलज्योतिष यांचा स्वतःच अभ्यास केला. शेवटी पोटाच्या सोयीसाठी कायद्याच्या जंजाळात लक्ष घातलं. आमचं कुटुंब गरीबच होतं आणि आमच्याकडे कुठलीही स्थावर मालमत्ता नव्हती. ते डोकं लढवत जमीनदारांची कड घेऊन, पण हृदयात मात्र गोरगरिबांबद्दल कळवळा होता. महात्माजींबद्दल पूज्यभाव होता. हा पूर्णतः स्वाध्यायी मनुष्य गोल्डस्मिथ, एडमंड बर्क आणि एक लोकप्रिय, पण सुमार दर्जाचा कादंबरीकार रेनॉल्ड्ज् या तिघांचाही चाहता होता. त्यांना इंग्रजी वाचता येत असल्यानं त्यांचा शब्दसंग्रह बऱ्यापैकी होता; पण बोलीभाषा त्यांना अवगत नव्हती. तरीही माझ्याकडून पाठांतर करून घेताना त्यांनी पुरुषसूक्तापेक्षाही जास्त कटाक्षानं वॉरन हेस्टिंग्ज्च्या चौकशीच्या वेळचं एडमंड बर्कचं भाषण मुखोद्गत करून घेतलं. माझा शब्दसंग्रह वाढावा, म्हणून हा खटाटोप; आणि मीही ते एखाद्या मंत्रासारखंच सरळसोट पाठ म्हणत असे! आता मलाच हसू येतं! कसला विपरीत प्रकार - नदीकाठचा अग्रहार, मांडी ठोकून पाठांतराला बसलेला बटू,आणि तोंडात एडमंड बर्कचं भाषण! ही पूर्व-पश्चिमेची टक्कर वडिलांच्या पोशाखात - फार कशाला, डोक्यावरच्या केसांतही नजरेला पडे. कधी फक्त शेंडी, कधी बारीक कापलेले केस असं करता-करता बारीक कापलेल्या केसांमधे लहानशी शेंडी या मुक्कामावर स्वारी आली.

आज मागे वळून बघताना मी एका आगळ्याच जगात राहत होतो, असं वाटतं. सकाळ वैदिक. दुपार शाळेत, तिथं एक शिक्षक पुराणांना भाकडकथा म्हणत. त्यासाठी उदाहरण गीतोपदेशाचं देत.रणक्षेत्रावर ऐन युद्धाच्या प्रसंगी एवढा दीर्घ उपदेश कुणी कुणाला करत बसणं शक्य तरी आहे का? असाएक बिनतोड सवाल टाकत. शाळेतून अग्रहाराकडे परत येण्याच्या वाटेवर शुभ्रवेषधारी मनुष्य- नीट गुळगुळीत दाढीबिढी केलेला, तिथल्या दवाखान्याच्या ओटीवर रेंगाळलेला असे. तो आम्हां पोरांना थांबवून बर्नर्ड शॉबद्दल ऐकवत असे. तो या ठिकाणी नसला, तर त्याही दिवसात तो एक तर इंग्रजी वाचत तरी असे किंवा बी. बी. सी. वरचं चोख इंग्लिश ऐकत तरी बसे. त्याचे स्वतःचं इंग्रजी व्याकरणशुद्ध आणि पेचदार होतं. त्याचा रेडियो डायनामोवर चालायचा.

पुढे बऱ्याच वर्षांनंतर मी उच्चशिक्षणासाठी इंग्लंडला जायला निघालो, तेव्हा या एके काळच्या मार्गदर्शक गुरूनं 'When will you be emplaning?' असा ग्रांथिक प्रश्न विचारला! त्याच्या लेखी चारचौघांत प्रचलित प्रश्न 'When are you flying?' ढिसाळपणाचं लक्षण!

अशा प्रकारे ज्या संक्रमणासाठी पश्चिमेच्या इतिहासाला शतकानुशतके लागली, तो प्रवास मी एका दिवसाच्या चार-सहा प्रहरांत लीलया करत असे.





अनुक्रमणिका

एक आर्यसमाजी सुधारक अग्रहारात येत. ते उक्रांतिवादाची बाजू घेऊन संस्कृत पंडितांना आव्हान देत. बोला. पृथ्वी गोल, की सपाट? ब्राह्मणांना जातिव्यवस्थेला मान्यता देण्याचा काय अधिकार? कुणी दिला? असे प्रश्न विचारणाऱ्या माहोलात मी गॅलिलिओचा समकालीन म्हणूनही खपून गेलो असतो!

अशा जगाचा वारसा मिळाल्यामुळं माझ्या अस्तित्वाची संगती लावायची, तर भोवतीच्या वास्तवानं विणलेला बंदिस्त कोष तोडून 'मिथकनाश करणं' भागच होतं. सभोवती 'पवित्र' मानलेल्या वस्तूंचा सुळसुळाट होता.

एका झाडाखालच्या दगडाला देव मानून लोक त्याची पूजा करत. मी मुद्दाम त्यावर लघवी करून येई. दगड म्हणजे दगड म्हणजे दगड, अन्य काही नाही, हे माझ्यापुरतं सिद्ध करून घेण्याचा तो मार्ग होता. कोपाच्या भीतीनं रात्री थरकाप उडे, पण प्रत्यक्षात काहीच वाकडं झालं नाही.

माझ्या वडिलांच्या मठाचा मला तिरस्कार वाटू लागला. मठानं गरीब कुळांवर जमिनीसाठी दावे घातले. सत्य मानलेलं तत्त्व आणि व्यवहार यांतील मतलबी दरी मला जाणवू लागली.

याच वेळी मी आमचे एक थोर कादंबरीकार श्री. शिवराम कारंत यांची 'चोमनादुडी' ही कादंबरी वाचली. जमिनीच्या मालकीसाठी धडपडणारा अस्पृश्य माणूस या कादंबरीचा नायक आहे. त्याची शोकांतिका वाचल्यावर त्यापूर्वीची सगळी वेड लावणारी प्रणयरम्य गुलगुलीत पुस्तकं बाष्कळ वाटू लागली. माझ्या भोवतालच्या प्रत्यक्षामधून पकड घेऊ शकणारी कथा निर्माण व्हायची, तर मला केवळ स्वावलंबी निरीक्षक बनण्याची गरज होती. मोठ्या माणसांना कारंतांच्या क्रांतिकारी विचारांचं वावडं होतं, किंबहुना ती त्यांचा धिक्कारच करत, तरी कारंतांच्या वाङ्मयीन कलागुणांबद्दल निर्विवाद कौतुकच होई. त्यांच्याबद्दल भारून जाऊन बोललं जाई. यातच मला वेगळेपणाचा मार्ग सापडला. मी नैतिक आणि प्रभावी ठरणाऱ्या कृतीची वाट शोधत होतो, मला समूहाची सामिलकीही हवी होती आणि भांडताही यायला हवं होतं - म्हणजे ते एका अर्थी स्वतःशीच भांडण असणार - आणि खरोखरी तसंच तर होतं!

या काळात मी अग्रहारापुरतं एक हस्तलिखित मासिक काढायला सुरुवात केली. त्याच सुमारास पूर्वी केव्हा तरी सैन्यात भरती होण्यासाठी पळून गेलेला एक सनातनी कुटुंबातला तरुण परत घरी आला. तो आम्हांला दूरदूरच्या देशांची, तिथल्या रीति-रिवाजांची माहिती सांगत असे. त्याच्या हाताखाली त्यानं आमची एक लुटुपुटूची पलटणच उभारली. मग काय, रोज सकाळी आमची कवायत सुरू झाली. आम्ही चर्चिल गट, हिटलर गट, बनून दुसऱ्या महायुद्धातल्या लढायांचा खेळ खेळत असू. ते दिवस ऐतिहासिक कलाटणीनं भारलेले होते. सनातनी मंडळी जगबुडी येणार, प्रलय होणार, पुराणातील भाकीत खरं ठरणारं, असं बोलत. गावात प्लेगची साथ

आल्यामुळं आमची शाळा बंद होती. शहराकडचा एक डॉक्टर येऊन अग्रहारातील सर्वांना लस टोचून गेला. टेकडीवरच्या अस्पृश्य वस्तीत मात्र तडफडून माणसं मरू लागली. एखादं कुटुंबच्या कुटुंब तडकाफडकी प्लेगच्या भक्ष्यस्थानी पडे. अशा वेळी त्यांच्या झोपडीच्या झोपडीच पेटवून देत. त्या वस्तीत एवढा हाहाःकार का झाला? काही वयस्क मंडळींच्या मते देशात इतरत्र त्यांचे जातभाई गांधींच्या चिथावणीमुळं मंदिरप्रवेश करून बाटवाबाटवी करत होते. त्याचं हे प्रायश्चित्त होतं, पण मला स्पष्ट दिसत होतं, क्री डॉक्टर उच्चवर्णीय असल्यामुळं शिवाशीव होईल, या कल्पनेनं त्यांच्या वस्तीत लस टोचायला फिरकलाच नव्हता.

या मृत्यूच्या आणि दुर्दैवाच्या फेऱ्यात एक घटना माझ्या लेखी रहस्यमयच राहिली. वस्तीवरची सर्वांत देखणी मुलगी नाहीशी झाली. ती का पळून गेली? इतरांप्रमाणेच तिनंही दैवगती का स्वीकारली नाही? मला एक गुपित माहीत होतं, तो सैन्यातून परत आलेला तरुण तिचा प्रियकर होता. त्यामुळं ती आता अस्पृश्य उरली नव्हती. अग्रहारामधल्या सर्वांत वांछनीय तरुणाला ती हवीशी वाटली होती. त्याच्या स्पर्शानं तिला चेतावलं होतं, जागवलं होतं. उचललंही होतं. तिच्या जाणिवा उचलल्या गेल्या, तशी ती जातीवेगळी होऊन शतकानुशतकाच्या दास्यातून मुक्त झाली होती.

माझ्या हस्तलिखित नियतकालिकात मी यावरून एक बोधकथा लिहिल्याचं स्मरतं. ती लिहिताना रूपकांचा, भाषेच्या फुलोऱ्याचा चांगला दाट आडोसा घेतला होता. कारण मला जे माहीत होतं, ते उघड करण्याची भीती वाटत होती. रूपकांच्या आश्रयाविना बोलण्याचं धाडस नव्हतं. आजही मला वाटतं, की लेखन-कार्यामधला हाही एक अंगभूत पेच आहे. आपल्या माणसांमधे राहून वेगळं तर व्हायचं असतं, मग भाषेला कधी रूपकांच्या, कधी प्रतीकांच्या साहाय्यानं वळवावं लागतं. रूपकाचं काम फक्त झाकण्याचं नाही किंवा फक्त उचकटण्याचंही नाही. रूपकामार्फत स्वतःला अज्ञात असलेल्या स्वतःच्याच कोनाकोपऱ्यातल्या अस्वस्थ करणाऱ्या धूसर जाणिवा आपल्याशा म्हणून पत्करताही येतात.

यानंतर जवळपास वीस वर्षांनी सातासमुद्रां पार इंग्लंडमधे असताना, खरोखरी जी कथा लिहायची होती, ती लिहून झाली. माझे तेव्हाचे प्रबंध-मार्गदर्शक नि आजचे स्नेही प्रा. मॅल्कम ब्रॅडबरी यांच्यासमवेत मी बर्गमनचा 'सेवन्थ सील' हा चित्रपट बघायला गेलो. चित्रपटातली शब्दभाषा कळत नव्हती आणि इंग्रजीतून संवादांचे अंकनही नव्हते. या 'सुयोगा'मुळे तो चित्रपट धुक्याआडूनच कळला. हा सुयोग अशासाठी, की एक शब्दांच्या अलीकडे राहिलेला झपाटणारा अनुभव आला. अशा अनुभवांनी सर्जक प्रतिभा कार्यान्वित होत असावी. चित्रपटातील नायकापुढचा आध्यात्मिक तिढा मला पोहोचला होता. मला आठवतं, की मी ब्रॅडबरींना म्हणालोही,





अनुक्रमणिका

युरोपियन माणसाला मध्ययुगीन वातावरण पुस्तकी व्यासंगानं उभं करावं लागतं. पण भारतीय लेखकांना ते साक्षात अनुभवानं व्यक्तिगत स्मृतीनं प्रतीत असतं. तेव्हापासूनचा हा माझा एक लाडका सिद्धान्त आहे. भारतीय लेखकांच्या जाणिवांमधे वेगवेगळ्या ऐतिहासिक कालखंडांमधून सिद्ध झालेली विश्वदर्शनं एकाच वेळी नांदत असतात. त्यामुळं त्यांच्या लेखी चॉसर, लँग्लंड, शेक्स्पिअर, डिकन्ज्, काम्यू हे सारे समकालीनच असतात. युरोपियन मनाला जाणवणारा ऐतिहासिक दुरावा त्यांना जाणवत नाही,

माझ्या या बोलण्यावर ब्रॅडबरी म्हणाले

तुम्हीच हे सह- अस्तित्व अनुस्यूत असलेली शैली आणि विषय यांचा शोध घ्यायला हवा.'

झालं, इंग्लंडमधे दोन वर्षं काढल्यानंतर मला शीण यायला लागला होता. सततच इंग्रजीत बोलणं भाग असल्यामुळं. शिवाय मी घरच्या आठवणींनी व्याकूळ झालो होतो. एका अर्थी प्रबंधाचं पुढचं प्रकरण लिहिण्याचं लांबणीवर टाकण्याजोगं सबळ कारण मी शोधतच होतो. मी म्हटलं, मी कादंबरीच लिहीन म्हणतो. माझे मार्गदर्शक पडले स्वतःच कादंबरीकार, त्यांना माझी कळ समजली. मग सारं जुळून आलं आणि 'संस्कार' ही कादंबरी विलक्षण वेगानं पूर्ण झाली. 'सेवन्थ सील' मधला जिप्सी या कादंबरीत 'पुट्टा' या पात्राच्या रूपानं दाखल झाला का? मला आठवतं, मी टिपण केलं होतं 'कादंबरीचा नायक प्राणेशाचार्य मागून कोण येतं आहे, ते बघायला म्हणून वळतो...' या क्षणी 'पुट्टा' आला आणि त्यानं अख्खी कादंबरी लिहूनच टाकली! अशा प्रकारे माझ्या अग्रहाराजवळ असलेल्या अस्पृश्य वस्तीमधून पळून गेलेल्या रूपवान मुलीपासून सुरू झालेली कहाणी सातासमुद्रांपार गेल्यानंतर बर्ग्मनच्या चित्रपटाच्या अनुभवांच्या ऊर्मीचं निमित्त होऊन वीस वर्षांच्या कालावधीनंतर इंग्लंडमध्ये सुफळसंपूर्ण झाली. माझ्या नेहमीच्या चिंतनविषयांपेक्षा म्हणजे मार्क्स, फ्रॉईड, सार्त्र, ईशावास्योपनिषद्- जे जे काही वाचलं होतं, त्यातून उद्भवलेल्या ध्यासापेक्षा, किंवा हेगलच्या विरोधविकास सिद्धान्तापेक्षा वेगळ्याच स्थळकाळात ही कादंबरी जन्माला आली. हेगलचा सिद्धान्त मी त्या वेळी अभ्यासतच होतो, कारण माझ्या प्रबंधाचा विषयच तसा होता : 'राजकारण आणि चवथ्या दशकातील इंग्रजी कादंबरी'.

आपल्यापेक्षा अधिक सामर्थ्य, अधिक चमक, अधिक देखणेपण असे गुण असणाऱ्यांच्या मेळातही आपण उठून दिसावं, दखलपात्र व्हावं, म्हणून मी लेखनाची सुरुवात केली. माझ्या खऱ्या विषयांकडे सुदैवानं पोचलो नसतो, तर माझे सगळे प्रयत्न इतरांच्या लेखी नगण्यच ठरले असते. माझ्या लेखनापैकी जे मला प्रसिद्धीला योग्य वाटलं, ते माझ्या आत्मसंवादाचंच रूप आहे. जे कधी लिहिलंच गेलं नाही, असंही खूप आहे आणि सर्वच लेखन या आत्मसंवादातून आकलनाच्या टप्प्यावर

पोहोचण्यात यशस्वी झालं, असंही म्हणता येणार नाही. ब्राह्मण कुटुंबातल्या संगोपनाचं वळण, वडिलांचा स्वाध्यायी पिंड, त्यांच्या अंगचं एकलव्याचं बळ आणि उणिवा, त्यांची इच्छाशक्ती आणि स्वतःच्या मुळांपासून दूर नेणारं शिक्षण या सर्व थापटण्यांनी मी घडलो आहे. शिवाय मी कानडीत लिहितो. माझ्या भाषेची परंपरा आणि आजची घुसळण यांत मी कधी सापडतो, तर कधी कर्तेपणानं तिला गती देतो या साऱ्यातूनही मला आकार मिळत असतो.

लेखक म्हणून मी काळात उलटा प्रवास करत जगतो आहे, असं मला वाटतं. उदाहरणार्थ, मी ग्रामीण व्यवस्थेतून निमशहरी व्यवस्थेत ('भारतीपूर' मधे) आणि तेथून संमिश्र ग्रामीण शहरी व्यवस्थेत ('अवस्थे' मधे) फार चाचरत, कां कूं करत आलो आहे. हे माझ्या कादंबऱ्यांप्रमाणेच माझ्या कथांच्या बाबतीतही खरं आहे. मला वाटतं, खरोखरीचं शहरी द्रव्य मला वळवता येत नाही. अजूनही मी भूतकाळाच्या ओझ्याखाली आहे, म्हणून असं होत असावं का? की माझ्या बालपणातली, खेड्यातली जिवंत कानडी भाषा इंग्रजीच्या स्पर्शानं प्रदूषित झालेली नव्हती, म्हणून असं होतं? व्यवसायानं मी इंग्रजीचा शिक्षक आहे. त्यामुळं सदोदित इंग्रजीतून बोलण्याचा दबाव माझ्यावर असतो. यामुळं कदाचित एक दुविधा पडते, त्यात मी भावनिक पातळीवर कानडी असतो आणि वैचारिक पातळीवर इंग्रजी. ही दुविधा सांधून एकात्म होणं खरोखरीच कष्टाचं आहे. (त्यासाठी स्वतःमधला इंग्रजीचा प्रांत कानडीसाठी अर्जित करावा लागतो.) सांस्कृतिक परिसरातील कल्पना आणि भावभावना अधिकाधिक प्रमाणात या एकात्मतेची मागणी करत आहेत. हे करताना आपली कानडी कृत्रिम होऊ नये, याची काळजी घेऊनच कविकर्म करत राहावं लागतं.

तुमच्या एव्हाना लक्षात आलंच असेल, की लेखक म्हणून वाढतानाचे अडथळे आणि समस्या राजकारणाशी निगडित होत्या. कानडीतून लेखन ही नेहमीच एक राजकीय कृती तर होतीच - मग त्याची जाणीव असो - नसो. दहाव्या शतकात अखिल भारतीय संस्कृत परंपरेला तोंड देऊनच पंप कवी नवी भाषिक परंपरा निर्माण करत होता. बाराव्या शतकात साक्षात्कारी क्रांतिकारक बसव यांनी ते जाणीवपूर्वक केलं - क्रांतिकारी अध्यात्माच्या प्रसारामधून या दोघांनीही संस्कृत परंपरा आत्मसात केली आणि परिवर्तित केली. त्यासाठी प्रादेशिक 'देशी' रीतीची मदतच कामी आली. पंप कवी जैन, तर बसवण्णा वीरशैव. दोघेही वैदिक धर्माविरूद्ध बंडखोरी करणारे. त्या काळी श्रेष्ठींची भाषा संस्कृत होती. आज इंग्रजी आहे. पंप आणि बसव हे जसे संस्कृत उत्तम जाणत, तसे आजचे कानडी लेखक इंग्रजी जाणतात. आम्हांलाही त्यांच्याप्रमाणेच इंग्रजी पचवून पुढं जायला हवं. अर्थात एक फरक आहे. इंग्रजी आणि तिच्या बरोबर येणारी तंत्रविद्याधिष्ठित पाश्चात्त्य संस्कृती अधिक परकी आणि वरचढ प्रवृत्तीची आहे. माझी कानडी भाषा आजवर राज्यकर्त्यांच्या





अनुक्रमणिका

वरचढपणाला तोंड देऊन टिकून राहिली. कारण बहुसंख्य कानडी भाषक निरक्षर होते, सांस्कृतिक विणीनं घट्ट बांधलेले होते. त्यामुळं त्यांच्या भाषेला दुहेरी शक्ती होती, वाचिक बोलाची आणि साहित्यिक परंपरेची. ग्रामीण जीवनात मुळं नसतील, तर कानडीतून सकस लेखन कठीण, हे त्यामुळं खरं ठरतं, त्याचबरोबर पश्चिमेचा वारा तुम्हांला अजिबातच लागला नसला, तरीही ते कठीण, हेही खरं आहे. त्यातून कित्येकदा एक दुभंगमनस्कता निर्माण होते.

अर्धं मन पश्चिमेच्या कल्पनांनी आणि अर्धं प्राचीन भारतीय कल्पनांनी व्यापल्यावर आपल्या प्रतिक्रिया कशा होतात, याचा विचार करताना मला गांधीजींच्या जीवनातील एक प्रसंग फार बोलका वाटतो. गांधीजी दक्षिण आफ्रिकेतून परत येऊन भारताचा दौरा करत होते, तेव्हाची गोष्ट. दरिद्री नारायणाची सेवा कशा प्रकारे करता येईल, याचा ते शोध घेत होते. एका पारंपरिक पंडितानं त्यांना पोशाखावरून टोकलं.

'उद्याचा महात्मा खरोखरी पूर्णतया भारतीय दिसायला नको काय? त्यानं यज्ञोपवीत घालून शेंडी राखायला नको काय?

या प्रश्नावर गांधीजींनी एक मान्य केलं, की राखलेले केस ही पाश्चात्त्य जीवनाची लाजिरवाणी छाया म्हणता येईल. कारण शेवटी आपली रीत त्यांना हास्यास्पद वाटू नये, म्हणून केलेली ती एक तडजोड. पण यज्ञोपवीताचा अधिकार फक्त उच्चवर्णीय द्विजांनाच आहे. ते मी का घालावं? नीच जातीतील गोरगरीब जानव्या- विनादेखील आपापलं साधं सोज्ज्वळ जीवन व्यतीत करतातच ना?

या चर्चेनंतर त्यांनी विचारान्ती शेंडी राखली; पण यज्ञोपवीत नाकारलं. अशा प्रकारच्या पर्यायांची विचारपूर्वक निवड ते अविरतपणे करत राहिले, याचा मला अचंबा वाटतो. त्यांचं पूर्वऽऽ व पश्चिमेशी असलेलं नातं त्यातून व्यक्त होतं. ते खरोखरी 'अंतरंगातले टीकाकार' होते - विलक्षण-विचक्षण.

महात्माजींना मी 'अंतरंगातला टीकाकार' म्हणतो, त्याला सबळ कारण आहे. ते भूतकाळाकडे तोंड करून बसलेले भावुक पौर्वात्य नव्हते, 'जुनं ते सोनं' म्हणत सगळ्याच गोष्टींचं पुनरुज्जीवन करण्याच्या बाजूचे ते नव्हते. त्याचबरोबर आधुनिकतेचा जप करीत संकुचित बुद्धिवादाचा आणि उथळ वैज्ञानिक विचार पद्ध-तीचा अवलंब करून संपूर्ण भूतकाळ एक ओझं म्हणून झुगारणारे पढीक 'उच्च आंग्लविद्याविभूषित'ही नव्हते. आजही इंग्रजी शिक्षणाच्या मुशीत घडलेले काही भारतीय लोक प्राच्यवाद आणि आधुनिकीकरण यांची एकत्र मोट बांधण्याचा प्रयत्न करतात. अंतिमतः तो फोल तर ठरतोच, शिवाय त्यातून भंपक विचार आणि भावनांची निर्मिती तेवढी होते. बथ्थड झालेले संवेदनाशून्य लोक तर एवढी मेळ साधत बसण्याची तसदीच घेत नाहीत. ते सुखेनैव आधुनिकीकरणाचा पुरस्कार करत राहतात. त्यापायी मुळापासून लक्षावधी जीवांच्या यातनांची त्यांना दिक्कत वाटत





अनुक्रमणिका

नाही. कम्युनिस्ट आणि खाजगी उद्योगाचे पुरस्कर्ते या दोघांनाही मी या गोटात घालतो. त्यांचं अंतिम ध्येय एकच आहे. त्यांचे तथाकथित प्रतिस्पर्धी म्हणजे पुनरुज्जीवनवादी-तेही त्यांतलेच. त्यांना अण्वस्त्रसज्ज समर्थ भारत हवा आहे. त्यांची स्मृती मुघल काळातं हिंदवी स्वराज्यस्थापना करणाऱ्या शिवाजीच्या मागे थेट याज्ञवल्क्यापर्यंत पोहोचतच नाही. हे सर्व विचारप्रवाह अंततः अनुकरणवादी आणि त्यामुळंच की काय, शोधक सर्जनशीलतेला मारक आहेत. आमच्या राजकारणी लोकांप्रमाणेच लेखक आणि विचारवंतही व्यावहारिक उपयुक्ततावादी मुद्द्यांवर अडकले आहेत, आधुनिकीकरणाने प्रभावित झाले आहेत. राष्ट्र म्हणून भारताच्या भवितव्याला त्यांच्यापासून दोन प्रकारचे धोके संभवतात - एक, वारसा वाया घालवण्याचा किंवा दुसरा, इराणप्रमाणे उलट्या गंगेत वाहण्याचा, परागतीचा. कोणत्याही ज़ादू-चमत्काराने हे परिणाम टळणार नाहीत. खऱ्याखुऱ्या 'अंतरंगातल्या टीकाकारा'ला भारतातील गरीब आणि विस्थापितांविषयी अपार करुणा व सहानुभूती बाळगणारं आणि मूल्यसंभ्रमाच्या काळातही वर्तमान प्रश्नांशी भिडण्याची तयारी ठेवणारं मानस घडवावं लागेल. असं मानस असेल, तरच भारताच्या संपन्न भूतकाळातून आजच्या सर्जनशीलतेला काय उचलता येईल, ते कळेल.

पण नेहमीप्रमाणेच, बोलणं सोपं, करणं अवघड राजकीय कार्यातही, आणि साहित्यिक म्हणूनही. असा शोध घेण्यापासून आपल्याला परावृत्त करायला लोकानुनय करणारे पुनरुज्जीवनवादीच नव्हे, तर तंत्रविद्येनं बलिष्ठ डावे-उजवे आधुनिकतावादीही टपले आहेत. त्यातून हा शोध आधीच आत्मिक बळाची परीक्षा पाहणारा, कष्टप्रद, काहीसा अप्रिय, नकोसा वाटणारा. लेखक म्हणून माझा स्वतःचा विचार करता मला असं दिसत, की एक शक्तिशाली गट मला उचलून धरतो. माझं लिखाण कितीही व्यामिश्र असो, माझे हेतू काहीही असोत. माझे समकालीन माझ्या लिखाणातल्या उघड, वरवरच्या, सहज पदरी पडणाऱ्या किंवा मग सध्या ज्या चलनी मुद्द्यांची 'हवा' असेल, त्यांना धरून प्रतिसाद देतात. त्यातून होतं असं, की जातिव्यवस्थेविरुद्ध बंडखोरी करणारा, व्यक्तिवादाचा पुरस्कर्ता, परंपरेच्या विरोधात गेलेला आधुनिकतावादी अशी बिरुदं मला मिळतात, कधी चाहत्यांकडून, कधी निंदकांकडून. आज मी जसा बोलतो आहे, तसं बोललो, की हल्ली मला परंपरावादी, 'पतित' क्रांतिवादी किंवा वयोमानाप्रमाणे मवाळलेला (की शहाणा?) लेखक असे शिक्के बसतात. माझ्या सुरुवातीच्या लेखनातील धर्मचिकित्सेची उत्कटता लोकांना जाणवलेली दिसत नाही किंवा नंतरच्या लिखाणातील आधुनिकतेची चिकित्साही.

तारुण्यातल्या निश्चितीचा जोश आता ओसरला आहे, हे तर खरंच आहे. हल्ली मला असे प्रश्न पडतात : परंपरेविरुद्ध बंड करताना आमची वर्गप्रेरणा सुखसोयींच्या इच्छेतून, स्वकेंद्रित सुखवस्तूपणाच्या आकर्षणातून उद्भवली होती, की नाही?

तिचा मोहरा चंगळवादाच्या दिशेनं वळलेला होता, की नाही? उदाहरणच घ्यायचं झालं, तर जातीबाहेर लग्न करण्याची आमची बंडखोरी सुरक्षित सरकारी नोकरीच्या छत्रीखालीच होती, की नाही? ज्या दारिद्र्यरेषेच्या काळावरचं जिणं लक्षावधी भारतीय जगतात त्यातून सुटण्यासाठी आम्हांलाही आधुनिकीकरण हवंसं वाटतं, की नाही? आणि तरी सुद्धा एकात्म समाजाची मूल्यं टिकावीत, अशी झुरणीही लागते आणि पश्चिमेच्या पंगतीला 'मानाचं पान' मिळावंसं वाटतं, की नाही? भारतीय लेखकांना या प्रश्नांची उत्तरं शोधावी आणि तपासावी लागतील. अन्यथा लेखन अस्सलपणालाच मुकेल, बेइमान होईल. हे उत्तर फक्त लेखकांनीच शोधावं, असं नाही. ते पुरणारही नाही. ही उत्तरं राजकीय आणि आर्थिक निवडीच्या रूपातही शोधायला हवीत. व्यक्तिगत पातळीवरील उत्तर शोधणंही अनेकांना जडच जाईल, कारण आपण म्हणजे काही कुणी टॉल्स्टॉय थोडेच असतो? पण आपण आपल्या परीनं, शक्य तेवढ्या प्रामाणिकपणानं या बदलत्या रूपाच्या वेदनांशी भिडलं पाहिजे. अशा वेळी सोपी उकल करून मोकळं होण्याचा खोटारडेपणा किंवा भावुकतेमागची आत्मवंचना हे दोन्ही टाळता आलं, तर कुणी सांगावं? आपली नजर थोडी अधिक साफ, अधिक कनवाळू, अधिक समजूतदार होईलही - एखाद्या चेकॉव्हसारखी.

भारतीय पारंपरिक जीवन आणि विचारसरणी एकीकडे आणि वैज्ञानिक बुद्धिवादी पश्चिमेची जोशीली आधुनिकता दुसरीकडे यांच्यांतील संघर्ष एका रूपकातून स्पष्ट होईल का? भारतीय परंपरेत शहाणपण आहे; पण ते एकूणात विगतलक्षी आणि लंगडं आहे. विज्ञाननिष्ठ बुद्धिवादी पश्चिमा उत्साहानं सळसळते आहे. पण आत्मकेंद्रित अंधळी आहे. पांगळ्याच्या पाठीवर बसणाऱ्या मूर्ख अंधळ्याची गोष्ट तुम्हांला माहीत असेल. त्याच्यासारखं करून जागच्या जागी रूतून बसण्यापेक्षा पांगळ्याला अंधळ्यानं पाठुंगळी घेतलं, तर दोघांचा फायदा, नाही का? पण नाही. पुन्हा वाटतं, की हे रूपक उचित नाही. कारण या संघर्षामधल्या दोन्ही बाजूंना आपापलं आंधळे-लंगडेपण मान्यच नाही. लंगड्या परंपरावादाला वाटतं, की कोणतीही चाल वायफळ आहे. कारण तो स्वतः सामंतवादी हितसंबंधांचा रक्षक आहे. अंधळ्या आधुनिकतावादाच्या घोडदौडीमधे अजून म्हणावा असा अटकाव झालेलाच नाही. त्यामुळं तथाकथित शहाण्या परंपरेचं ओझं खांद्यावर वागवण्याची त्याला गरज वाटत नाही. त्यामुळंच तर भारतामधे एकीकडे जातिव्यवस्था नाकारणारे लोक दुसरीकडे सर्वंकष सत्तेचं तत्त्व मान्य करतात. किंवा आपल्याला एक भोंगळ उदारमतवादही दिसतो. तो वरकरणी पश्चिमाभिमुख असला, तरी अंतर्यामी भावनिक दृष्टीनं परंपरावादीच असतो. दुसरे परंपरावादी जीवनपद्धतीला चिकटून राहणारेही आहेत. ते बिनदिक्कत विज्ञानाच्या देणग्या वापरतात; पण शेवटी बरेचजण आंग्लाळलेले भट नाहीत काय? अगदी त्यांमध्ये सर्वांत संवेदनाशील म्हणून सर्वज्ञात असलेले पंडित जवाहरलाल नेहरू सुद्धा? आता हे माझं रूपक कुठं येऊन पेचात

पडलं, पाहा. म्हणजे यात अंतर्विरोध आहे किंवा मग ज्या गोष्टी विचाराच्या सोयीसाठी वेगळ्या काढल्या त्यांच्यांतला विरोधभाव मावळण्याजोगा आहे. काही म्हणा, या प्रश्नाची सतावणी राहणारच, कारण आपल्या आजच्या रचनेत प्रगती, विकास, इत्यादींची कोणतीही गंधवार्ता न पोचलेल्या भुकेल्या निरक्षरांची ना दाद, ना फिर्याद. आपण ज्याला प्रागतिक, आधुनिक म्हणतो, ते सर्वांसाठी हितकर आहे का? असेल, तर ते सर्वांना उपलब्ध आहे का? हे प्रश्न आपल्याला रात्रंदिवस भुंगा लावणारच, निदान लावायला हवा.

मी अशा प्रश्नांनी स्वतःला जखडून टाकलं आहे, की त्यांची उत्तरं फक्त साहित्यिक असूच शकत नाहीत. त्यामुळं हे संकल्पन माझ्यातल्या लेखकाच्या उपयोगापलीकडे पसरतं. ऑर्वेल स्वतः क्रियाशील कार्यकर्ता असूनही, त्याच्या लक्षात येऊन चुकलं होतं, की लेखकाला काही वेळा अ-कर्ता असावं लागतं - जे काही आहे, ते पदरी घेण्यासाठी. प्रामाणिकपणे ते प्रतिबिंबित करण्यासाठी. निदान माझ्यासारख्या लेखकांनी स्वतःच्या मर्यादांचा विसर कधीच पडू देऊ नये- कदाचित, त्यातच आमचं बळही सामावलेलं आहे. आम्ही राजकीय चळवळींमध्ये चांगले कार्यकर्ते नसू कदाचित् - आणि मला तर व्यक्तिशः हे किशोरवयातच कळून चुकलं! एकदा शेतकऱ्यांच्या समाजवादी लढ्यात पडलो, तेव्हा आणि पुढं इंदिरा गांधींच्या विरोधात मोहीम चालवली, तेव्हाही. तरी लेखक हा नागरिक असतोच आणि नागरिकत्वाच्या जबाबदाऱ्या त्याला टाळता येणार नाहीत. आपण कोणी खास, वेगळे आहोत, अशा समजुतीत राहिलो आणि आपली तरल वगैरे विशुद्धता, या जगाच्या असह्य वगैरे कोलाहलापासून दूर होऊन जपत बसलो, तर बाष्कळ सौंदर्यवादाच्या गर्तेत पडण्याशिवाय गत्यंतर नाही. जगणं म्हणजेच गुंतणं आणि आपल्या हाताबाहेरच्या घटितांच्या सान्निध्यात असणं; आणि तरीही लेखनानं अलिप्तता आणि विहंगावलोकनाची क्षमता मान्य केलेल्या असतातच. कदाचित आपण अशा कालखंडात जगतो आहोत, की विहंगावलोकन नुसतं कठीणच नव्हे, तर अक्षम्यही ठरावं. येटस् यांनी एके ठिकाणी लिहिलं आहे :

'हाच तर निवडक निवडीचा प्रश्न आहे. विहंगावलोकन करता करता सामान्य लोकांच्या नजरेपार जायचं, की बाजारातल्या छकड्यावर बसायचं. पण नेहमी एक गोष्ट साधली पाहिजे. 'मी' ला आत्मन् सांगाती राहिला पाहिजे. जर बाजारातले छकडे 'मी' ला भूल घालत असतील, तर आत्मन् ठामपणे शरीरातच असला पाहिजे, कारण पिढ्यान् पिढ्या तिळातिळानं घडलेल्या सूक्ष्म सौंदर्यानंच तो मोहित झालेला आहे. केवळ ताज्या रक्ताची सळसळ म्हणून सामर्थ्याचं किंवा रूपाचं आकर्षण त्याला दीर्घकाळ असह्य वाटत राहणार आहे.'

जरी अशा प्रकारे आपण बाजारातल्या छकड्यावर बसणं पसंत केलं असलं, तरी आपल्याजवळ समाजवैज्ञानिक किंवा अर्थवैज्ञानिक वापरतात, तसली

विश्लेषणाची हत्यारं नाहीत, हे लक्षात ठेवायला हवं. त्याचप्रमाणे राजकारणी डावपेचांत तरबेज असणारी माणसं ज्या कौशल्यानं माणसं खेळवतात, ते तर टिपूसभरही नाही. रॉबर्ट फ्रॉस्टसारखं आपण उगीच सार्वजनिक लाडकं माणूस होण्यातही अर्थ नाही. कारण मग आपण चाहत्यांच्या अपेक्षांचे कैदीच बनून जातो. आपल्या प्रत्येक पुस्तकागणिक काही चाहते दुरावले नाहीत, तर काही तरी बिघडलं आहे, याची खूणगाठ लेखकांनी बांधायला हवी. अन्यथा आपण आपलेच 'यशस्वी' कित्ते गिरवून आपणच उभी केलेली प्रतिमा सांभाळत बसण्यात अडकून राहू. फर्ड्या वक्त्याचं वक्तृत्व धोकादायक असतं. कारण त्याच्या प्रभावानं जनसमुदायाच्या भावना चेतवल्या जातात. लोकांना सुखावणारं, दिलासा देणारं असत्य ऐकायला आवडतं. हे जरी खरं असलं, तरी त्यांचा आत्मा सत्याचा भुकेला असतो. आपण संपूर्ण एकटे असताना आपल्याला जे वाटतं, ते आणि तेच सांगण्याची ताकद आपण कधीही गमावता कामा नये. आपण स्वतःलाच फसवू लागलो आहोत, आणि असत्याच्या आहारी गेलो आहोत, अशा थराला जर गोष्टी गेल्या, तर आपल्याला कुणीच वाचवू शकत नाही. सार्वजनिक व्यक्ती होण्यामधले, राजकीय पक्षाचे प्रवक्ते होण्यामधले, सत्ताधीशांच्या ताब्यातले राजकवी होण्यामधले हे सर्व धोके होत. कुणी तरी म्हटल्याप्रमाणे कला ही अजूनही लपायला चांगली जागा आहे. तिनंच तर सोल्झेनित्सिनला आस्तिक्यबुद्धी शाबूत ठेवता आली आणि तिनंच धार्मिक असहिष्णुतेच्या कडव्या आणि कडवट काळातही नास्तिकांचं शील राखलं. जॉइसनं म्हटल्याप्रमाणे कलाकार शक्ती मिळवतो, ती मौन, विजनवास आणि चतुराई यांतून. कलावंताला अशा प्रकारे एकाच वेळी गनिमी कावा आणि बिनीची चढाई- या दोन्ही प्रकारची लढाई खेळावी लागते.

आज कानडीत लेखक होणं याचा नेमका अर्थ काय? आणीबाणीच्या काळात - आता पंधरा वर्षं उलटून गेली - या प्रश्नाचं एक दर्शन मला अस्वस्थ करून गेलं, बेचैनी आली. आमच्या घटनेनं बहाल केलेल्या मूलभूत हक्कांवर गदा आल्यावर त्याबद्दलच प्रत्येकाच्या मनात विचार असे, पण बोलण्यावर बंदी. (बोलायचीं चोरी सुद्धा.) या निकडीच्या प्रश्नावर काही करता येत नाही आणि कागदावर मात्र अस्तित्वाची सुखदुःखं, प्रेम, मरण या सार्वकालिक विषयांवर काळं करत बसणं कसं शक्य आहे? असं वाटण्यातही अंतर्विरोधच होता. कारण आज मारे हक्कांच्या नावे गळे काढायला, जेव्हा हक्क अबाधित होते, तेव्हा त्यांची काय बूज राखत होतो? कधी परोपकारी बुद्धीनं त्यांचा वापर केला होता? पण ते गेले म्हटल्यावर त्यांचा ध्यास लागला. लेखनकला भाषाश्रयी आहे. भाषा रोजच्या साध्या सामान्य बोलण्या- चालण्यापासून दार्शनिक चर्चेपर्यंत वापरली जात असते. आणीबाणीच्या काळात भाषा पहिल्यांदा बळी जाते. कारण एकाधिकारशाही तगते, ती भाषेच्या गैरवापराच्या जोरावर. त्या काळात साहित्यिकांच्या एका सभेत मी व्याख्यानाला उभा राहिलो आणि मला

सभेच्या अपेक्षेची धग तीव्रपणे जाणवली. त्यांच्या मनातली ठसठस मी बोलून दाखववावी, निदान त्या विषयाला तोंड फोडावं या अपेक्षेनं प्रत्येक जण कान लावून बसला होता. याचा माझ्यावर इतका परिणाम झाला, की सगळा भित्रेपणा गळून पडला. सभेपूर्वी जे बोलेन, असं कधीच वाटलं नव्हतं ते थेट बोलत गेलो.

लेखनव्यवसाय आपल्या लोकांना अजूनही महत्त्वाचा वाटतो आणि लेखकानं सदसद्विवेकबुद्धीची राखण करावी, अशी अपेक्षाही ठेवली जाते. लेखक 'अंतरंगातला टीकाकार' झाल्याशिवाय त्याला हे करताच येणार नाही. त्यानं प्रवाहाविरूद्ध पोहण्याचं धाडस सोडता कामा नये. जो माणूस स्वतःचा आतला आवाज ऐकू शकत नाही, त्याच्याजवळ जनलोकांना देण्याजोगं काही नसतं, राजकीय पक्ष आणि सरकारांनी अगदी स्वहितरक्षणार्थसुद्धा हे लक्षात घ्यावं की संकटांच्या काळात त्यांनाही निकोप, निःस्पृह शहाण्यासुरत्यांची गरज पडते. त्यांनी उठवलेल्या जमावाचे तेच निर्माते आणि तेच दास! तेव्हा शहाणपण दुर्मीळच झालेलं असतं.

**मूळ इंग्रजीवरून अनुवाद : श्यामला वनारसे.**

इतिवचनः अनंतमूर्ति यांनी जर्मनीमध्ये ट्यूबिंगन येथे १९९२ साली हे भाषण दिले.

मूळ प्रकाशनः 'बीइंग ए रायट्‌र इन इंडिया', समावेशः दिलीप चित्रे, ग्युंटर डी., झाँटहायमर आणि इतर, संपादक : टेंडर आयरनीज, ए ट्रिब्यूट टू लॉटर लुत्से, नवी दिल्ली : मनोहर, १९९४ पृष्ठे २३७-५०

**लेखक :** १०, माधवनगर, मणिपालः ५७६११९, कर्नाटक.

**अनुवादक :** आवर्तन, ५, हिल व्ह्यू सोसायटी, ४६/४ एरंडवणे, पौड रस्ता, पुणे : ४११ ०३८.

(डॉ. अनंतमूर्ति यांच्या मूळ इंग्रजीतून डॉ. श्यामला वनारसे यांनी अनुवादिलेल्या दुसऱ्या एका संलग्न विषयावरील भाषणाकडे या निमित्ताने आम्ही 'पत्रिकेच्या वाचकांचे लक्ष वेधतो. 'विविधता आहे, म्हणूनच भारत अजूनही टिकून आहे', **साप्ताहिक सकाळ** (पुणे) ३०:०३:१९९६ पृ. १६-२०, पुणे येथे ०२:१०:१९९५ ला झालेले भाषण - संपादक )

❒❒

ज्याला कोणतीच परभाषा येत नाही त्याला स्वभाषा येत नाही.
योहान व्हुल्फ्गांग फॉन ग्योटे (१७४९-१८३२), माक्सिमेन उंट रेफ्लेक्सिओनेन

# पदबंधविचार : स्वरूप, अंतःशिक्षा आणि त्यांचे प्रमाणन

शैलेश सदाशिव पुंडलीक

काही पारिभाषिक संज्ञा आणि संकल्पना
भाग एक : रेखीयता-नियमबद्धता :

मानवाच्या इतर कृती आणि अनुभूती यांच्याप्रमाणे रेखीयता/रेखात्मकता (Linearity) हा भाषेचाही एक स्वभावविशेष आहे. भाषेत वापरले जाणारे ध्वनी आणि त्यांचे अभिव्यक्तिधर्म यांचा परस्परसंबंध यदृच्छ असला, तरी काही प्रारंभिक मर्यादांपर्यंत 'स्वच्छंद वागणारी/भासणारी भाषा नंतर मात्र नियमबद्ध किंवा काही बाबतींत तर, फारच काटेकोरपणे नियमबद्ध आहे असे आढळू लागते. त्यांतही तिची ही नियमबद्धता आणि रेखीयता यांचा काही अन्योन्य संबंध[१] असावा, असेही दृष्टोत्पत्तीस येऊ लागते. उदा., ज्या ध्वनिसमुच्चयाच्या रेखीय अनुस्यूततेमुळे इंग्रजीत pat (प् ॲ ट्), apt (ॲ प् ट्), tap (ट् ॲ प्) यासारखे अर्थवाही रूपिम[२] तयार होतात, तीच रेखीयता, तीच अनुस्यूतता आणि तोच ध्वनिसंघात असूनही pta (प् ट् अ), tap (ट् प् ॲ), atp (ॲ ट् प्) वगैरेंना मात्र अर्थवाहित्व किंवा रूपिमता प्राप्त होत नाही. याच स्वरूपाची नियमबद्धता वाक्यरचनेच्या पातळीवर सुद्धा आढळते. उदा.,

१अ) Shivaji was coronated on Raigad
शिवाजीला झाला राज्याभिषेक वर रायगड
शिवाजीला रायगडवर राज्याभिषेक झाला.
या वाक्यात आणि

ब) Raigad **was coronated** on Shivaji
रायगड झाला राज्याभिषेक वर शिवाजी
रायगडाला शिवाजीवर राज्याभिषेक झाला.

या वाक्यांतील फरक त्यांच्यामधील शब्दांच्या काही विशिष्ट रचनांनुसार बदलतात, हे स्पष्ट आहे. त्याही पुढे जाऊन

क) Shivaji coronated Raigad on was
शिवाजीला राज्याभिषेक रायगडवर झाला

शिवाजीला रायगडावर राज्याभिषेक झाला

यांसारखी वाक्यरचना तर इंग्रजीत उत्पन्नच होत नाही. तेव्हा ध्वनी/ध्वनिसमूह आणि त्यांच्या काही विशिष्ट रेखीय रचना याच व्याकरणसंमत होतात, अन्य नाही, हे स्पष्ट होते.

प् ॲ ट् (pat) हा रूपिम म्हणून मान्य होण्यासाठी आणि ॲ ट् प् (atp) हा रूपिम म्हणून मान्य न होण्यासाठी इंग्रजीत कार्यान्वित असलेली जी नियमबद्धता आहे, आणि इंग्रजी स्वभाषा (भा१/L1/मातृभाषा native language) म्हणून वापरणारा भाषक जी नियमबद्धता बहुशः असजगपणे (unconsciously)[3] वापरतो, ती नियमबद्धता भाषेतील ध्वनी आणि त्यांचे अर्थवाहित्व यांना जोडणारा दुवा आहे, असे म्हणता येऊ शकेल. त्या नियमबद्धतेला रेखीयतेची एक पार्श्वभूमी असते. भाषेच्या कार्याचे स्वरूप समजावून घेण्यासाठी तिचा विचार होणे आवश्यक आहे.

ध्वनिसंघाताच्या रेखीयतेमुळे (मानवी श्वासोच्छ्वासाच्या मर्यादा लक्षात घेऊन) अनुस्यूत होणारा ध्वनिप्रवाह सकृत् दर्शनी तरी एक अविच्छेद्य संतत (unanalyasable continuum) वाटतो. तथापि, ध्वनींचा संतत हा वाक्यप्रयोगच मुळात स्वव्याघाती आहे. प्रत्यक्षात हा ध्वनिप्रवाह विच्छेद्य, पृथक् अशा ध्वनिसंपुटाचा संघात असतो (analysable/discreete quanta of sounds) भाषाव्यवहारात वक्ता आणि श्रोता त्यांना अतिसहजतेने उपयोजित करीत असतात. मात्र ज्या अंतःशिक्षांमुळे[४] (intuitions) हा भाषाव्यवहार सिद्ध होतो, त्यासंबंधीची सजगता वक्त्याश्रोत्यांत फारशी आढळत नाही. पण व्याकरणाच्या अभ्यासात त्यांचा आधार अपरिहार्य असल्याने त्यांचे स्पष्टीकरण आणि दृढीकरण/प्रमाणन करणे अतिशय आवश्यक आहे.

**भाग दुसरा : व्याकरण, अंतःशिक्षा आणि त्यांचे स्वरूप**

भाषेच्या रेखीयतेमुळे तिला नियमबद्धता येते, असे म्हणणे कदाचित धाडसाचे ठरेल. कदाचित असे म्हणणे सयुक्तिक ठरेल, की नियमबद्धतेचा आविष्कार रेखीयतेच्या माध्यमातून होतो. कारण तिच्यामुळे पदे, पदबंध यांचे प्रकटीकरण सुकर होते. पहिल्या टीपेत स्पष्ट केल्याप्रमाणे अर्थधारणाची क्षमता असणाऱ्या ध्वनीला किंवा ध्वनिसंपुटाला रूपिम, पद असे म्हणता येते आणि त्यासंबंधी भाषकांना एक तिहेरी अंतःशिक्षा असते. तिचे स्वरूप आता समजून घेऊ.

2) a) The rose is a flower.

या वाक्याचे विश्लेषण करताना the, rose, is, a आणि flower असे पाच रूपिम उपलब्ध होतात. त्यांची संख्या, त्यांचे उच्चार, त्यांचे कार्य या विषयांवर इंग्रजीच्या स्वभाषकांचे (native speakers) साधारणपणे एकमत होते. विशेषतः ते रूपिम/ती पदे

2) b) th ero sei sa flower

या स्वरूपात किंवा तत्सम अशा अन्य स्वरूपात उपलब्ध होत नाहीत, याबद्दल तर त्यांचे जास्तच दृढ एकमत होईल. त्यामुळे असे आढळते, की वरवर पाहता अविच्छेद्य वाटणारा ध्वनिसंतत हा वास्तविक पूर्वज्ञात किंवा पूर्वैकमत (already agreed upon) असलेल्या पृथक् एककात विश्लेषित होतो. काही विशेष ध्वनी काही विशिष्ट रेखीय रचनेत उपलब्ध होतील, तेव्हाच त्यांना पद ही संज्ञा मिळते. ही भाषकांची अंतःशिक्षा व्याकरणाच्या अभ्यासाचा मूलाधार आहे.

पदस्वरूपाच्या अंतःशिक्षेप्रमाणेच भाषकाला पदबंध रचनेच्या स्वरूपासंबंधी सुद्धा एक महत्त्वाची अंतःशिक्षा असते. एक म्हणजे काही स्वरूपाची पदे निसर्गतःच एकमेकांसंबंधी नजीकता (intimacy) दर्शवितात; त्यामुळे त्यांचे वाक्यामध्ये ध्रुवीकरण होते आणि the,rose वगैरे पदे ज्याप्रमाणे एकके या स्वरूपात विश्लेषित होतात, त्याप्रमाणे ही ध्रुवीभूत पदे सुद्धा पदबंध म्हणून एकके या स्वरूपात विश्लेषित होतात. उदा.

२) क) the आणि rose

ड) a आणि flower

आणि

इ) is आणि a flower

यांचा एकमेकांशी नैसर्गिक संबंध असल्याने the rose, a flower आणि is a flower यांसारखे पदबंध तयार होतात. the आणि is किंवा a आणि is यांचे the is, a is यांच्या सारखे पदबंध तयार होत नाहीत. त्यामुळे इंग्रजीच्या संभाषकांना २. a) या वाक्याचे नैसर्गिक विश्लेषण करायला सांगितले तर ते

२ फ) The rose is a flower




s = sentence
पदबंध a flower, is a flower आणि the rose.

याप्रमाणे करतील. म्हणजे वाक्यातील घटकांची संख्या आणि त्यांचे परस्परान्वयी संबंध यांसंबंधी त्यांना अतिशय ठाम आणि अचूक अंतःशिक्षा असतात.

पदबंधांसंबंधी भाषकांना असणारी अजून एक अंतःशिक्षा म्हणजे पदबंधांतील पदाच्या श्रेणिस्तरीय (hierarchical) प्राधान्यासंबंधी आहे. पदबंधाची रचना श्रेणिस्तरीय आहे, याचा अर्थ असा, की त्यांतील एक पद प्रधान असून, बाकीची गौण असतात. इंग्रजीत या प्रधानपदाला हेड (Head) असे म्हणतात. उदा.,

३) अ) The rose

ब) The beautiful **rose**

क) The beautiful **rose** in the garden

ड) ............





अनुक्रमणिका

इ. इ. पदबंधातील त्रज्ञव हाच शब्द केंद्रस्थानी असून, इतर शब्द तटीय (marginal) असतात. Transforrnational generative grammar मध्ये ही श्रेणिस्तरीयता वृक्षाकृतींनी दाखविण्याची पद्धत आहे. या वृक्षाकृतींना Phrase marker (p- marker) असेही नाव आहे. त्याप्रमाणे २) अ) हे वाक्य




असे दाखविता येते. या वृक्षाकृतीत (tree diagram) निर्देशित केलेल्या बिंदूंना nodes असे म्हणतात.

### भाग तिसरा : घटक आणि पदबंध यांच्या जाती

वाक्यातील लघुतम निम्नस्तरीय एकके (पदे/रूपिमे) एकमेकांशी संयोग पावून वाक्याला अंगभूत (constituent) अशी उच्चस्तरीय एकके बनवीत जातात. त्यांतील क्रम म्हणजेच रेखीयता आणि विशिष्टता व्याकरणाच्या अभ्यासाला सारभूत आहेत. विशिष्ट स्वरूपाची रूपिमे/पदे वाक्यात एकमेकांची जागा घेऊ शकतात; काही पदे ही फक्त इतर काही पदांनतरच वाक्यात आढळू शकतात; काही पदे ही काही विशिष्ट पदांबरोबरच पदबंध तयार करतात .याचाच अर्थ ही पदे, त्यांनी रचलेले पदबंध वगैरे सर्वच काही विशिष्ट प्रकारच्या जातींमध्ये (Categories) वर्गीकृत करता येतील. rose, flower, water...... वगैरेसारखी पदे नाम; is, was, slept,went वगैरेंना क्रियापदे वगैरे म्हणतात. पदांप्रमाणेच पदबंधाचेही वर्ग (किंवा जाती) होत असल्याने त्यांना नामपदबंध, क्रियापद पदबंध (Noun phrase, Verb phrase) जातीत विभागता येते. उदा.,

४) The rose was very beautiful.

या वाक्यातील The rose हा नामपदबंध, was very beautiful हा क्रियापदबंध, तर very beautiful हा विशेषणपदबंध आहे. पदबंधातील प्रधानपदाच्या वर्गानुसार पदबंधाचा वर्ग ठरविला जात असल्यामुळे

५) in the corner

या पदबंधातील प्रधानपद in हे अव्यय (Preposition) असल्याने त्याला Prepositional phrase असे म्हणायला हवे.

### थोडेसे विषयांतर : ताँस्निएर यांचा धारणाक्षमतेचा विचार :

पदबंधांच्या रचनेत एक प्रमुखपद आणि अन्य काठावरची (peripheral, marginal) पदे असे रचना-वैशिष्ट्य आढळून येते. त्यामुळे वाक्य हे एखाद्या सम्राटाने छोट्या मांडलिकांवर आधिपत्य गाजवावे, त्याप्रमाणे छोट्या पदबंधांवर राज्य करते.





अनुक्रमणिका

पण त्यांच्या त्यांच्या प्रदेशात मात्र त्यांतील प्रधानपदे प्रमुख असतात.

तॉस्निएर यांचा धारणाक्षमतेचा विचार सरधोपट किंवा सरळसोट वाटतो. ते सुद्धा पदांच्या उच्चनीच स्तरांचा विचार करतात, हे खरे; पण एकदा क्रियापद हे उच्च स्तरावरचे मानले की बाकीची सर्व पदे त्यांच्या दृष्टीने समस्तरीय होतात. उदा.,

६) रामाने आंब्याची चार झाडे लावली.

हे वाक्य ते

६अ)




याप्रमाणे विश्लेषित करतील. वास्तविक पाहता

(६ब) चार झाडे

हा पदबंध




असा विश्लेषित होऊन त्यातच झाडे हे उच्चस्तरीय पद मानायला हवे. त्यामुळे ६अ) हे वाक्य मांडताना




असे दाखवायला हवे. त्यातही लावणे ह्या क्रियापदाला (त्याच्या क्रियापद पदबंधत्वामुळे) असलेल्या प्रमुखपदत्वामुळे ते **आंब्याची चार झाडे** या सर्व पदबंधापेक्षा उच्चस्तरीय होते. पण रामाने हा पदबंध मात्र तद्व्यतिरेकामुळे त्याला समस्तरीय राहतो. या कारणामुळे **रामाने** हा पदबंध **आंब्याची चार झाडे** या पदबंधापेक्षा उच्चस्तरावर आहे. या कारणांमुळे तॉस्निएर यांनी क्रियापदाला दिलेले उच्चस्तरीयत्त्व आणि इतर (सर्वच) शब्दांना दिलेले निम्नस्तरीयत्त्व हे मान्य होण्या जोगे नाही. असो,

**भाग चौथा : पदांचे वर्गीकरण, वर्गांचीद्धजातींची आवश्यकता :**

नामपदबंध, क्रियापदपदबंध वगैरेसारखे पदबंधांचे वर्गीकरण करण्यासाठी पदांचे नामे, क्रियापदे, विशेषणे वगैरेंसारख्या जातीत[७] (categories) वर्गीकरण करावे लागते. सर्वसाधारणपणे John, Anne, he, she वगैरेंसारखी पदे नामे; run, slip, strew वगैरेंसारखी पदे क्रियापदे आहेत. यासंबंधी इंग्रजीच्या मूळभाषकांना

अंतःशिक्षा आहेत. त्याप्रमाणे त्यांना पदबंधांच्या वर्गीकरणासाठी सुद्धा काही विशिष्ट अंतःशिक्षा आहेत, असे आढळून येते.

आता प्रश्न असा, की वर्ग, अंतःशिक्षा वगैरे सर्वच गोष्टी अमूर्तस्वरूपी असल्याने पदांच्या या भिन्न भिन्न वर्गाचे आणि अर्थातच, त्यांच्यासंबंधी असणाऱ्या अंतःशिक्षांचे प्रमाणन कसे करणार? दुसऱ्या शब्दांत म्हणायचे, तर भाषकांच्या अंतःशिक्षा त्यांची फसवणूक करीत नाहीत, असे सिद्ध करायचे असेल, तर त्यांसाठी निरीक्षणीय (observational, experiential) असा पुरावा सादर करता आला पाहिजे.

अँड्र्यू रॅडफर्ड यांनी आपल्या Transformational grammar[७] या पुस्तकात पदांच्या जाती-व्यवस्थेसंबंधी आणि त्यांच्या प्रमाणनासाठी काही मुद्दे मांडलेले आहेत. ते या संदर्भात लक्षणीय आणि विचारार्ह आहेत. त्यांची ही काहीशी स्वैर तोंड-ओळख.

(विविध पण) मर्यादित संख्येच्या ध्वनींनी भाषेतील अनंत शब्द आणि अर्थातच, अनंत नवनवी वाक्ये तयार होऊ शकतात. हे शब्द एकाच वेळी दोन पातळ्यांवर कार्यरत असतात. एक म्हणजे, ते इतर पदांच्या सहानुवर्तित्वाने (con-currence) पदबंध, वाक्य वगैरेंसारखी मोठी होत जाणारी एकके तयार करतात. दुसऱ्या पातळीवर त्यांच्याच जातीच्या इतर शब्दांचा एक सट तयार होऊन (काही विशिष्ट अटींची पूर्तता करून) दिलेल्या वाक्यात (in a given sentence) त्यांच्यातील कोणताही शब्द दुसऱ्या कोणत्याही तत्सम शब्दाची जागा घेऊ शकतो. उदा.,

७अ) मी त्याला एक पुस्तक दिले.

या वाक्यातील **मी** हा शब्द त्याला, एक ..... वगैरे शब्दांशी काही विशिष्ट संबंधांनी जडित होतो (gets related). त्यामुळे त्याने काही विशिष्ट अर्थ व्यक्त होतात. उदा. मी हा शब्द

७अ) या वाक्यात तृतीया विभक्तीत आहे. हे लक्षात येण्यासाठी त्याच्याजागी **त्याने** हा शब्द वापरला, म्हणजे झाले.

७ब) **त्याने** त्याला एक पुस्तक दिले.

वाक्यामध्ये (बहुशः) काही विशिष्ट ठिकाणी वापरल्या जाण्याच्या या रेखीय क्षमतेमुळे जो अर्थ व्यक्त होते,. त्याला 'व्याकरणीय अर्थ' म्हणतात; आणि ज्या क्षमतेमुळे किंवा रेखीय संबंधांमुळे हे अर्थ व्यक्त होतात, त्यांना व्याकरणीय किंवा रेखीय संबंध (grammatical syntagmatic relation) असे म्हणतात.

या उलट, **मी** आणि **त्याने** किंवा खरे म्हणजे **मी** आणि **तो** हे शब्द इतर अनेक शब्दांबरोबर नाम या नावाच्या वर्गात समाविष्ट होतात. त्यांचा एकमेकांबरोबरचा संबंध (Paradigmatic relation) संवर्गी संबंध आहे असे म्हणता येते. नाम, क्रियापद, विशेषण, क्रियाविशेषण यांसारखे पदांचे संवर्ग (categories) भाषाव्यवहारात आणि

भाषाशिक्षणाच्या क्षेत्रात आधारभूत असतात. काही विशिष्ट संवर्गाचे शब्दच काही ठराविक नियमांचे पालन करून भाषाव्यवहारात वापरता येतात. म्हणूनच त्या संवर्गांचे आणि नियमांचे ज्ञान मिळवण्यासाठी भाषक काही मर्यादित आणि दर्जाच्या दृष्टीने असमाधानकारक (degenerate) अशा उपलब्धीतूनही भाषिक कौशल्ये आत्मसात करू शकतात. वयाच्या अवघ्या पाचव्या-सहाव्या वर्षापर्यंत कुणाही सर्वसामान्य बालकाला उपलब्ध होणाऱ्या भाषाव्यवहारांच्या साहाय्याने त्या भाषेचे व्याकरण आत्मसात करता येते. संवर्गाच्या आणि व्याकरणाच्या नियमांचे पालन न करता वाक्यात कोणताही शब्द कोणत्याही ठिकाणी येऊन कोणताही अर्थ व्यक्त करू लागला, तर भाषाशिक्षणच अशक्य होईल. असे नव्हे, तर सर्व भाषाव्यवहारही अशक्य होईल.

**भाग पाचवा : पदे, पदबंधांच्या अस्तित्वाचे पुरावे**

संवर्गांचे अस्तित्व भाषाशिक्षणाला आणि भाषाव्यवहाराला उपयुक्त आहे , असे म्हणणे वेगळे आणि त्यांच्या अस्तित्वाच्या सिद्धतेसाठी अनुभूत्यनुसारी (empirical) पुरावा सादर करणे हे वेगळे. या संदर्भात रॅडफर्ड यांनी उच्चार, अर्थ आणि व्याकरण या तीन पातळ्यांवर विविध पुरावे दिलेले आहेत.

शब्दांच्या पातळीवर विचार करताना असे आढळते, की आघातानुसार काही विशिष्ट इंग्रजी शब्दांचे कार्य बदलते. उदा., सर्वसामान्यपणे पहिल्या ध्वनिच्छेदावर (syllable) आघात असेल, तर तो शब्द नाम असतो किंवा दुसऱ्या ध्वनिच्छेदावर आघात असताना तो क्रियापद असतो. या कारणामुळे "su'bject (ना.), subje'ct (क्रि), O'bject (ना.), Obje'ct (क्रि.), i'ncrease (ना.), increa'se (क्रि.) यांसारख्या अनेक शब्दांच्या जाती त्यांतील आघाताच्या वैशिष्ट्यांवर अवलंबून असतात.

८ अ) I 'increased my height.

ब) I i'ncreased my height.

९ अ) The incre'ase in my height was remarkable.

ब) The in'crease in my height was remarkable.

या वाक्यांपैकी ८) मधील (अ) मध्ये तर ९ मधील (ब) मध्ये increase या शब्दावरील आघात चुकीच्या ध्वनिच्छेदांवर आलेले आहेत किंवा दुसऱ्या शब्दांत सांगायचे तर (८) मधील (अ) च्या increase ची आणि (९) मधील (ब) च्या increase ची वाक्यातील जागा चुकीची आहे.

दुसरा पुरावा अर्थविन्यासाच्या आधारावर देता येतो. किंबहुना पारंपरिक व्याकरणकार अर्थभेदांच्या आधारावरच शब्दांच्या जाती ठरवीत असत. उदा., क्रिया दर्शविणारा शब्द क्रियापद, वस्तू, व्यक्ती, प्रसंग दर्शविणारा शब्द नाम अशा स्वरूपाच्या व्याख्या त्यांच्या लिखाणात आढळतात. पण अर्थ हा निकष वापरताना

फार काळजी घ्यायला हवी. उदा., assasination हा शब्द क्रियावाचक असला, तरी नाम आहे; fast हा शब्द वास्तविक पाहता क्रियाविशेषण असला, तरी fast food, fast cars यांमध्ये तो विशेषण आहे. त्यामुळे अशा प्रकारे शब्दांच्या व्यख्या करणारे पारंपरिक व्याकरणकारांचे विवेचन ग्राह्य मानता येत नाही.

मात्र अर्थविचाराला रूपिमविचाराची संरचनावादी साथ दिली, तर बरेच विश्वासार्ह निष्कर्ष हाती लागतात. असे दिसते, की क्रियापदाला -er हा प्रत्यय लावल्यास त्याचे नामात रूपांतर होते. उदा., fill - filler, till - tiller, इ. इ. हा प्रत्यय नामांना किंवा इतर जातीच्या शब्दांना जोडता येत नाही. उदा., well - weller*, meal - mealer* इ. इ. -er हा प्रत्यय विशेषणांना जोडला जाऊ शकतो, असे वाटेल, पण प्रत्यक्षात तसे होत नाही. filler, tiller यांमध्ये -er या प्रत्ययाने 'ती विवक्षित क्रिया करणारा' असा अर्थ व्यक्त होतो; पण nicer-nicer, fast-faster वगैरे शब्दांत त्या गुणधर्माचे आधिक्य दर्शविले जाते. filler,tiller ही क्रियापदांची नामे झाली, तरी nicer, faster ही विशेषणेच राहतात. अशाच प्रकारे काहीसा प्रकार - ly या प्रत्ययाच्या वापरात आढळतो. तो विशेषणांना जोडला जातो; तेव्हा ती क्रियाविशेषणे होतात, पण तो जेव्हा नामांना जोडला जातो, तेव्हा ती विशेषणे होतात. उदा., nice-nicely, right-rightly, इ.इ., पण man-manly, woman-womanly, इ. इ. या विवेचनातील crucial मुद्दा असा, की -ly प्रत्यय विशेषणांना जोडल्यावर त्यांना -er हा प्रत्यय जोडता येत नाही. पण नामांना जोडल्यावर मात्र त्यांना -er हा प्रत्यय जोडता येतो. उदा. nicelier*, rightlier*, पण manlier, lovelier, इ. इ. -er हा प्रत्यय काही विशिष्ट संवर्गाच्या सदस्यांमध्येच वापरता येतो. त्यामुळे nice आणि man हे प्रत्यक्षात संवर्गात न समाविष्ट होणारे शब्द सुद्धा nice आणि manly म्हणून एका संवर्गात जमा होतात.

प्रत्ययांचा विचार हा संरचनावादी आणि आग्रही स्वरूपातील आनुभविक विचार आहे. काही विशिष्ट अर्थ व्यक्त करण्यासाठी रूपिमांना काही कठोर नियम पाळावे लागतात. यावरूनच संवर्गाच्या मानसिक सत्यतेचा (psychological reality) पुरावा मिळतो.

(८) आणि (९) या वाक्यांतील (अ) आणि (ब) या जोड्यांचा विचार करताना (८अ) मधील 'increase तर (९ब) मधील in'crease या शब्दांच्या जागा एक तर चुकलेल्या आहेत किंवा त्यांतील आघात चुकीच्या ध्वनिच्छेदावर मांडले गेले आहेत. असे म्हणायची वेळ आली होती. याचा अर्थ ध्वनिच्छेदातील पर्यायाने शब्दाघातातील फरकानुसार वाक्यातील शब्दांच्या जागा बदलतात किंवा शब्दाघातातील फरक वाक्यरचनानुसारी असतात, असे म्हणायला हवे.

परंतु शब्दांच्या जाती वास्तविकरीत्या अस्तित्वात नसत्या, तर पूर्वपरिच्छेदातील ही विधाने उत्पन्नच झाली नसती. कारण मग increase हा शब्द

वाक्यात नामाच्या, क्रियापदाच्या, विशेषणाच्या किंवा अन्य कोणत्याही शब्दांच्या जागी वापरता आला असता. त्याप्रमाणे

१०) अ) The surprising increase

ब) The increase surprising

क) Surprising the increase

किंवा अन्य काहीही रचना वापरता आली असती. पण काहीशी शिथिल वाक्य-रचना वापरणाऱ्या मराठीसारख्या भाषांमध्ये सुद्धा शब्दांच्या जागा ठरलेल्या असतात. हे खरे, की मराठीत आघातांमुळे शब्दांच्या जाती बदलत नाहीत; पण तरीही मराठीतील वाक्यरचना पूर्णपणे शिथिल आहे, असे होत नाही.

याहीपुढे जाऊन असे म्हणावे लागेल, की अगदी संस्कृत (किंवा लॅटिन) सारख्या भाषांतही वाक्यातील शब्दांच्या जागा ठराविकच असतात. संस्कृत वाक्यातील कोणताही शब्द कुठेही लिहिला, तरी त्याच्या अर्थामध्ये फरक पडत नाही. असे म्हणणे हे एक अर्धसत्य आहे. पूर्णसत्य हे आहे, की व्याकरणिक अर्थांच्या सर्व प्रकारच्या अभिव्यक्तीसाठी संस्कृतला आवश्यक असणारे सर्व रूपिम संस्कृतमध्ये पृथक् आणि सुस्पष्टरीत्या उपलब्धच नाहीत. त्यामुळे व्याकरणिक अर्थाचा काही भार विभक्तिप्रत्ययांप्रमाणेच वाक्यरचनेला सुद्धा वाहावा लागतो. उदा.,

१२अ) आसीदशेषनरपतिशिरःसमभ्यर्चितशासनः पाकशासन इवापरः शूद्रको नाम राजा। (बाणभट्टाची क्षमा मागून)

या वाक्यात सर्व राजांत श्रेष्ठ ,यथायोग्य राज्य करणारा, जणू दुसरा इंद्रच असा शूद्रक नामक राजाचे वर्णन येते. पण हे वाक्य शूद्रकाच्या वर्णनासाठी आहे, हे आपल्याला त्यातील पाकशासन (इंद्र) आणि शूद्रक या शब्दांच्या स्थानांवरून समजते. त्या वाक्यरचनेऐवजी

१२ब) आसीदशेषनरपतिशिरः समभ्यर्चितशासनः शूद्रक इवापरः पाकशासन नाम राजा।

अशी वाक्यरचना केली, तर जणु दुसरा इंद्रच या प्रयोगाऐवजी 'जणू दुसरा शूद्रक' अशी रचना होऊन ,हे वाक्य पाकशासन नावाच्या राजाच्या वर्णनपर होईल. तात्पर्य हे, की व्याकरणिक अर्थाच्या सर्व छटा केवळ रूपिम प्रचुरतेच्या साहाय्याने व्यक्त करणे हे अगदी संस्कृतात सुद्धा शक्य नाही.

पण रूपिमप्रचुरता काय किंवा वाक्यरचनेचे नियम काय, त्यांनी व्यक्त केलेला व्याकरणिक अर्थ नुसत्या शब्दांच्या अर्थापेक्षा (over and above) काही जास्त, असा असतो. हे खरे, की शब्दांच्या अर्थांच्या अनुरोधानेच हे अशाब्द (non-lexical) अर्थ व्यक्त होतात. पण ह्या अशाब्द अर्थांनी दिली जाणारी माहिती ही संवर्गाच्या स्वरूपातील असते. संवर्ग हे केवळ व्याकरणकारांच्या कल्पनाविलासाचे खेळ असते, तर तत्संबंधीच्या माहितीची आवश्यकता आणि तदनुसार वाक्यरचना या





अनुक्रमणिका

दोन्ही गोष्टी कधी उपपन्न झाल्या नसत्या. पण मग वाग्व्यवहार सुद्धा कधी उपपन्न झाला नसता. कारण कोण काय म्हणत आहे, हे इतर कुणालाही कधीही उमगले नसते.

**भाग सहावा : पदबंध : विविध रचना आणि संवर्ग :**

आतापर्यंतच्या विवेचनात असे गृहीत धरल्यासारखे होते, की रूपिमे आणि शब्द या मूलभूत एककातून पदबंध आणि वाक्य या उच्चश्रेणीय एककांची निर्मिती होते. त्यामुळे, विविध शब्दांचा समुच्चय म्हणजे वाक्य, असा एक समज होतो. प्रत्यक्षात असे आढळते, की शब्द या एककांनी वाक्याची रचना होत नसून, त्याचे खरे एकक पदबंधच आहे.

भाग-२ (पृ.२-४) मध्ये स्पष्ट केल्याप्रमाणे नाम, क्रियापद, इत्यादींसारख्या पदांना प्रमुख करून त्यांच्या अनुरूपतेने येणाऱ्या गौण आणि तटीय पदांचा संघात ही पदबंधांची रचना असते. हे पदबंध खरेच भाषकांच्या मानसिक सत्याची स्थिती आहे, की व्याकरणकारांच्या विश्लेषणाच्या सोयीसाठी तयार केलेल्या अमूर्त रचना (constructs) आहेत? या संदर्भात रॅडफर्ड यांनी घेतलेले एक उदाहरण लक्षणीय आहे.

१३अ) The king's crown

या वाक्यखंडात The king हा एक पदबंध आहे, हे स्पष्ट आहे. षष्ठी विभक्तीप्रमाणे स्वामित्वाची भावना निर्देश करणारा 's हा प्रत्यय king या शब्दाला जोडल्यासारखा दिसतो. आता प्रश्न असा की १३अ) मध्ये The, king हे शब्द पृथक् एकके मानून ,त्यांतील king या शब्दाला 's हा प्रत्यय जोडला जातो, असे म्हणावे, की The king हे एक एकक मानून त्या पदबंधाला 's जोडला जातो, असे म्हणावे? म्हणजे




१३ब) आणि १३क) यांपैकी कोणती वृक्षाकृती जास्त उपपन्न होते, याचा विचार करायला हवा.

१४अ) This crown is the king's

असे म्हटले असता 's हा रूपिम king या शब्दाला जोडणे अपरिहार्यच आहे. कारण तो the ला जोडून the's असे रूप तयार होत नाही, हे सर्वज्ञात आहे. पण जिथे





अनुक्रमणिका

अशी अपरिहार्यता बाध करीत नाही, असेही काही पदबंध आहेत. उदा.,

१४अ) हे वाक्य

१४ब) This crown is the king of England's किंवा

१४क) This is the king of England's crown असेही म्हणता येते.

आता १४ब) आणि १४क) यांमध्ये The king of England हा पदबंध आहे. पण 's हा प्रत्यय England या शब्दाला जोडलेला आहे आणि ते अर्थविज्ञानाच्या दृष्टीने उपपन्न नाही. कारण मुकुट हा एखाद्या व्यक्तीचा म्हणजेच राजाचा असतो, एखाद्या देशाचा नव्हे. पणे म्हणून १४क) पुनर्रचित करून १४ड) This is the king's of England crown* असे म्हणणेही उपपन्न होत नाही. तसेच,

१४ई) This is the king's crown of England,* असेही म्हणता येत नाही. हे असे का व्हावे, याचे विस्तृत विवेचन करण्याची ही जागा नव्हे; पण असे स्पष्ट दिसते, की काही विवक्षित आणि मर्यादित अर्थांनी king, the king, the king of England हे एकसंवर्गी संबंधात असून ते एककांप्रमाणे वागतात. म्हणजे वाक्यातील काही ठराविक जागांवर ते पूर्ण परावर्ती (freely interchangeable) असतात. या एककातील मूलद्रव्ये एकमेकांशी जास्त सहवर्ती (cohesive) असतात. 's सारखा प्रत्यय त्या सहवर्तित्वाला बाध आणून त्यातील कुणाही एका मूलद्रव्याशी संयोग पावेल, अशी शक्यता नाही.

's हा प्रत्यय the king of England या पदबंधाला अंगीभूत (integral element) नाही, हे स्पष्ट करण्यासाठी त्याच अर्थाचा of हा शब्द वापरता येईल. त्याप्रमाणे

१५अ) The king of England's हा पदबंध

१५ब) of the king of England

असाही लिहिता येतो. of हा शब्द सुद्धा पदबंधातील मूलद्रव्यांच्या सहवर्तित्वाचा भंग करून लिहिता येत नाही.

१५क) the of king of England

अशी रचना उपलब्ध होत नाही. वास्तविकतः **'s** आणि **of** या दोघांचाही साक्षात संबंध king शब्दाशी आहे, पण तरीही डावीकडे the आणि उजवीकडे of England या पदांना निम्नस्थित (supercede) करून. ते king शी साक्षात् आणि अप्रतिहत संबंध स्थापू शकत नाहीत.

१५अ प्रमाणे with या अव्ययाचाही king या शब्दाशी संबंध असणारे पदबंध दाखविता येतात. उदा.

१६अ with the King of England



किंवा

१६ब The King of England with whom ......



of किंवा 's प्रमाणे with सुद्धा the king of England हा पदबंध फोडू शकत नाही. तरीही with चा संबंध king शी आहे, हे सर्वांनाच मान्य आहे.

या निरीक्षणातून मांडता येणारा निष्कर्ष असा :

१) पदबंधातील प्रधान घटकाशी संबद्ध असणारे बहिःस्थित घटक संपूर्ण पदबंधाशीच संबद्ध असतात. कारण

२) पदबंध हा नेहमी एक स्वसंबंद्ध एकक (hornogeneous unit) म्हणून कार्य करीत असतो.

. आता फक्त प्रश्न असा, की पदबंध व्याकरणकारांच्या कल्पनेतील खेळ नाहीत हे मान्य, पण अमुक प्रकारचाच पदबंध तयार होतो, असे म्हणण्यास काय आधार आहे? हे स्पष्ट आहे, की 's, of, with सारखे शब्द king या शब्दाशी म्हणजे एका नामाशी संबद्ध आहेत. पण त्या नामपदबंधाशी संबद्ध असणारे शब्द इतर पदबंधांशी संबद्ध नाहीत, असे खरेच सापडते का? उदा., Very handsome हा विशेषण-पदबंध घेतला, तर

१७ अ) The crown of the king of England हा पदबंध

१७ ब) The crown of very handsome किंवा

१७ क) very handsome crown असे बदल करून लिहिता येत नाहीत. त्यासाठी त्यात प्रधानपद म्हणून एखादे नाम येणे आवश्यक आहे. म्हणून

१७ ड) The crown of very handsome's king

ई) The very handsome king's crown किंवा

१८ अ) with the very handsome king

ब) the very handsome king with whom हे उपपन्न होतात.

१८ क) with very handsome किंवा

ड) very handsome with whom हे अशक्यच आहेत.

या निरीक्षणांवरून येणारा दुसरा निष्कर्ष असा, की,

भाषेतील प्रत्येक शब्द स्वतःच्या एका विशिष्ट व्यक्तिमत्त्वानुसार म्हणजेच त्याच्या संवर्गानुसार कोणत्या शब्दांशी संबद्ध होत जावा, याचे जे काही नियम आहेत. आणि ज्यांना बहुधा अपवाद नाहीत, असे नियम आत्मसात करणे यालाच भाषाशिक्षण म्हणायला हवे.

**टीपा :**

१) ध्वनींची रेखीयता आणि भाषेची नियमबद्धता यांची तात्त्वज्ञानिक चर्चा

करण्यास इथे पुरेशी जागा नाही. असे मात्र निश्चित दाखविता येते, की काही ध्वनी (उदा., tp, pk, dny सारखे) इंग्रजीत शब्दांच्या सुरुवातीस कधी आढळत नाहीत. काहीं विशिष्ट क्रमाने येणारे ध्वनीच अर्थवाही ठरू शकतात, तर काही नियमबद्धतेमुळे एक रेखीयता उत्पन्न होते. अशा अर्थाने त्यात अन्योन्यसंबंध आहे असे मानावे.

२) अर्थाच्या लघुतम वाहकांना रूपिम (morpheme) असे म्हणतात. इंग्रजीत -s हा प्रत्यय बहुवचनाचा अर्थ व्यक्त करतो. त्यामुळे table, chair, fan अशांसारख्या शब्दांबरोबरच -s (वर्तमानकाळवाचक), -ed (भूतकाळवाचक), -er/-est (तरतम भावदर्शक) वगैरे शब्दखंड सुद्धा रूपिम म्हणून मानलेले आहेत.

३) unconsciously हा शब्द अनेकजण मराठीत 'अबोधपणे' असा सादर करतात. पण इंडोयूरोपियन भाषांच्या व्युत्पत्त्यांचा थोडा विचार केल्यावर मला 'असजगपणा' हा शब्द जास्त समर्पक वाटतो.

४) unconsciously प्रमाणे intuition साठी सुद्धा मला मराठीत समर्थक शब्द सापडत नाही. तेव्हा पुन्हा इंडोयुरोपियन व्युत्पत्त्यांचा आधार घेत in-tuition चे मी 'अंतःशिक्षा' असे शब्दशः भाषांतर करीत आहे.

५) Contours याला मराठीत 'किनार' असे रूप दिले, तर त्याचे बहुवचन काय करावे, हा प्रश्नच आहे. या टीपेचा मुद्दा रूपिमांच्या indentities बद्दलचा आहे. रूपिमांच्या आणि ध्वनींच्या किनारींसंबंधी भाषेच्या विविध स्वरूपांत अनेक प्रकारचे वैविध्य सापडते. पण तरीही त्यांच्या identities बद्दल ऐकमत्य आढळते.

६) तॉस्निएर यांच्या धारणा-क्षमतेच्या उपपत्तीसंबंधी माझ्या काही आक्षेपांचा विचार मी अन्यत्र केलेला आहे. (पाहा : भाषा आणि जीवन १४:१, हिवाळा, १९९६)

त्यामुळे इथे त्याची पुन्हा चर्चा करणे अप्रस्तुत ठरेल. तरी सुद्धा तॉस्निएर यांनी पदबंधविचार आणि वाक्यरचना विचार यांतील फरक लक्षात न घेता त्यांची उपपत्ती मांडलेली आहे, असे वाटते. पण ते विचार व्याकरणाच्या अभ्यासात महत्त्वाचे वाटल्याने इथे केवळ त्या संदर्भात तॉस्निएर यांच्या विचारांचा उल्लेख केलेला आहे.

७) रॅडफर्ड, अँड्रयू (१९८९) ट्रान्स्फॉर्मेशनल ग्रॅम (र)

८) * अशी तारांकित वाक्ये किंवा शब्द ट्रान्स्फॉर्मेशनल व्याकरणाच्या चर्चेत जेव्हा येतात, तेव्हा ते महत्त्वाचे आहेत, असा त्यांचा अर्थ नसतो; तर ते वाक्य किंवा तो शब्द व्याकरणदृष्टीने चुकीचा/अमान्य आहे, असा त्याचा अर्थ आहे.

९) Supercede (उंपरिसीद) या शब्दाचा प्रस्तुत वाक्यात प्रयोग करणे मला अवघड वाटले, म्हणून मी त्याच्या विरुद्ध अर्थ व्यक्त करण्यासाठी निम्नस्थित असा शब्द घेतला. प्रत्यक्षात Supercede चे भाषांतर म्हणून 'निम्नस्थित' हा शब्द वापरण्याचा माझा प्रयत्न नव्हता. म्हणून वाचकांनी मला क्षमा करावी.

**भाषाशिक्षण विभाग, एस्.एन्.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०.**

❑❑





अनुक्रमणिका

धन परक्याचे

# 'भाषांतरकाराचे कर्तव्य आणि उत्तर-दायित्व' : शार्ल बोदलेरच्या 'ताब्लो परिझियाँ' च्या जर्मन भाषांतराची प्रस्तावना'

मूळ लेखक- व्हाल्टर बेन्यामिन
भाषांतर : अनिकेत जावरे

*व्हाल्टर बेन्यामिन (१५ जून, १८९२- २६ सप्टेंबर, १९४०) याचा वरील लेख म्हणजे त्यानेच केलेल्या एका भाषांतराची प्रस्तावना होय. ही प्रस्तावना आणि बोदलेर या फ्रेंच कवीच्या 'पॅरिसचे ताब्लो' चे भाषांतर १९२३ मध्ये प्रसिद्ध झाले. भाषांतर, समीक्षा आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञान या क्षेत्रांमधील या लेखाचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. बेन्यामिनचा इतरांपेक्षा वेगळा असलेला मार्क्सवाद, 'इतिहासा' ची त्याची वेगळी समज, त्याच्या मृत्यूनंतरच अधिक वाढलेली त्याची प्रसिद्धी, त्याची दुर्दैवी आत्महत्या, अशा निरनिराळ्या कारणांमुळे बेन्यामिनला पाश्चात्त्य विचारात वेगळेच स्थान मिळत गेले. 'फ्रान्कफूर्ट स्कूल' मधल्या विचारवंतांशी असलेली त्याची मैत्री, विशेषतः, थिओडोर अडोर्नो (१९०३-१९६९) या तत्त्वज्ञाशी असलेले त्याचे मैत्रीचे संबंध, बेर्टोल्ड ब्रेरव्तची आणि बेन्यामिनची मैत्री, 'मार्क्सवादी' विचारपद्धतीतील काही धारणांवर त्याने केलेली प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष टीका, त्याच्या अप्रकाशित टिपणात दिसणारी त्याची विचारशैली, इत्यादींमुळे त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या लेखनाला आणि प्रकाशित-अप्रकाशित विचारांना अधिकाधिक महत्त्व मिळत गेले आहे.*

*भाषांजराबद्दलच्या विचारात बेन्यामिनवादी व बेन्यामिनविरोधी असे दोन गट सहजपणे पाडता येतात. सद्यःपरिस्थितीत जेव्हा केवळ इंग्रजीतूनच नव्हे, तर गुजराती, बांगला, कन्नड, हिंदी अशा 'जवळच्या' भाषांतूनही मराठीत भाषांतरे होत आहेत, आणि साहजिकच अधिकाधिक लेखक-वाचक भाषांतराबद्दल विचार करू लागले आहेत, अशा परिस्थितीत बेन्यामिनचा विचार मराठी वाचकांसमोर असावा, अशा विचाराने, आणि बेन्यामिनच्या ५६ व्या पुण्यतिथीच्या निमित्ताने खालील*





अनुक्रमणिका

*भाषांतर सादर करत आहे. इतर आवश्यक माहिती तळटीपांमधून दिली आहे. भाषांतराचा हा पहिला भाग आहे.*[२]

### *भाग-१*

### 'भाषांतरकाराचे कर्तव्य आणि उत्तर-दायित्व (task) : शार्ल बोदलेरच्या 'ताब्लो परिझियाँ'च्या जर्मन भाषांतराची प्रस्तावना

एखाद्या कलाकृतीचे किंवा कलाप्रकाराचे नीट ज्ञान करून घ्यायचे असेल, तर त्या कृतीचे किंवा प्रकाराचे ग्रहण करणाऱ्या व्यक्तीचा विचार करणे कधीही फलदायी ठरत नाही. ग्रहण करणाऱ्यांच्या विशिष्ट गटाचा किंवा त्यांच्या प्रतिनिधीचा विचारही आपल्याला भलतीकडेच नेतो. एवढेच नव्हे, तर एखाद्या आदर्श, काल्पनिक वाचक-ग्रहणकर्त्याची संकल्पनादेखील कलेच्या सैद्धांतिक विवरणात अडसर ठरते. अशा संकल्पनेच्या मांडणीत केवळ मानवाचे अस्तित्व आणि सत्त्व गृहीत धरण्यापलीकडे काहीच घडत नाही. कलादेखील हेच करते, मानवाचे भौतिक, कायिक आणि आध्यात्मिक सत्त्व गृहीत धरते; परंतु कलेच्या कोणत्याही कृतीमध्ये मानवाच्या विशिष्ट प्रतिक्रियेशी तिचा संबंध नसतो. म्हणून कुठलीही कविता तिच्या वाचकासाठी नसते, कुठलेही चित्र त्याच्या दर्शकासाठी नाही, कुठलीही सिंफनी तिच्या श्रोत्यांसाठी नाही.

ज्यांना मूळ, आद्यकृती समजत नाही अशा वाचकांसाठी एखादे भाषांतर असते काय? मूळ, आद्यकृती आणि भाषांतर यांच्या कलाक्षेत्रातील स्थानातला फरक या प्रश्नामुळे पुरेसा स्पष्ट होईल, असे वाटते. 'त्याचीच' पुनरुक्ती करण्यासाठी हा एकच आधार संभवतो, असे वाटते. एखादी कविता काय 'म्हणते'? काय 'सांगते'? ती ज्यांना कळली, त्यांना काहीच 'सांगत' नाही. माहिती सांगणे, देणे, वाहून नेणे किंवा काही विधान करणे हे कवितेचे सत्त्व नाही. जर एखाघा भाषांतराचा हेतू माहिती वाहून नेण्याचा असेल, तर ते भाषांतर माहितीशिवाय काहीच वाहून नेऊ शकत नाही, आणि म्हणूनच निःसत्त्व, अनावश्यक असेच काही तरी केवळ वाहून नेऊ शकते. तर असे माहितीचे वहन करणे हे निकृष्ट दर्जाच्या भाषांतराचे द्योतक आहे. पण माहिती वाहून नेण्यापलिकडचे असे जे काही काव्यात असते- आणि निकृष्ट भाषांतरकारदेखील मान्य करतातच, की हे जे अधिक असे आहे, ते काव्याचे आवश्यक सत्त्व आहे- ते म्हणजे काहीतरी अनिर्बंध, अनाकलनीय, 'काव्यात्म' हेच नव्हे काय? असे काही तरी, की ज्याची स्वतः कवी असल्याशिवाय भाषांतरकार पुनर्निर्मिती करू शकत नाही? हा असा विचार निकृष्ट भाषांतराच्या दुसऱ्या गुणधर्माला कारणीभूत ठरतो. या गुणधर्माची यामुळे अशी व्याख्या करता येईल; अनावश्यक अर्थ बिनकाटेकोरपणे दाखवणे. भाषांतर जोपर्यंत वाचकाची सेवा करण्याचा आग्रह धरते, तोपर्यंत ते यापेक्षा अधिक काहीच असत नाही; अधिक काहीच करू शकत नाही. आणि जर भाषांतर

वाचकांसाठी असे केलेले असेल, तर मूळ, आद्यकृती देखील तशी असणारच. जर मूळ, आद्यकृतीच वाचकांसाठी नसते, तर भाषांतर कसे असेल?

भाषांतर हा एक आकृतिबंध आहे. त्याचे असे आकृतिबंध म्हणून आकलन करून घेणे म्हणजे मूळ, आद्यकृतीकडे परत जाणे होय. कारण मूळ, आद्यकृतीतच-तिचे भाषांतर होऊ शकते, या भाषांतराच्या शक्यतेतच-भाषांतराचा अधिनियम आढळतो. एखाद्या कृतीचे भाषांतर होऊ शकते, हा प्रश्न दुपदरी आहे. म्हणजेच या विशिष्ट कलाकृतीला तिच्या वर्तमान आणि भविष्यातील वाचकांमधून तिचा योग्य भाषांतरकार लाभेल काय? आणि हा दुसरा मुद्दा अधिक मुद्द्याला धरून आहे- मूळ, आद्यकृतीमध्ये स्वभावतःच, भाषांतराची शक्यता आढळते काय? आणि म्हणूनच भाषांतराचा विशिष्ट- आकृतिबंध लक्षात घेता मूळ, आद्यकृती स्वभावतःच, नैसर्गिकरीत्या भाषांतराची मागणी करते काय? पहिला प्रश्न शक्यतांच्या दृष्टिकोनातून सोडवला पाहिजे, दुसरा मात्र सिद्ध करणे आवश्यक आहे. या दुसऱ्या प्रश्नाच्या वेगळ्या, स्वतंत्र अर्थाकडे पूर्णपणे दुर्लक्ष करणाऱ्या उथळ विचारसरणीतच केवळ हे दोन्ही प्रश्न एकच आहेत, असे समजले जाईल. या संदर्भात हे ध्यानात आणून देणे आवश्यक आहे, काही विशिष्ट संकल्पना तेव्हा व्यवस्थित समजतात, जेव्हा त्यांचा संबंध प्रथमपासूनच मानवाशी जोडला जात नाही. उदाहरणार्थ, एखादे आयुष्य किंवा क्षण जरी सर्व मानव तो विसरून गेले असतील, तरी 'अविस्मरणीय' आहे, असे म्हणणे शक्य आहे. जर त्याच्या सत्त्वातच तो विसरला न जाणे आवश्यक असेल, तर वरील विधान खोटे ठरत नाही. त्यातून मानव पूर्ण करू शकत नाही, अशी एक आवश्यकता, आणि ती आवश्यकता ज्यात पूर्ण होईल ,असे एक विश्व- म्हणजेच ईश्वराची स्मृती-या दोन्ही एकाच वेळी दर्शविल्या जातात. अशाच प्रकारे जरी काही कृतींचे भाषांतर करणे मानवाला अशक्य असले, तरी त्यांच्या भाषांतराच्या शक्यतेचा प्रश्न खुला राहू शकतो; आणि, खरोखरच, भाषांतराची काटेकोर संकल्पना गृहीत धरल्यास, काही अंशी तरी हे असेच असणे खरे नाही काय? अशा विश्लेषणाच्या आधारानेच एखाद्या साहित्यकृतीचे भाषांतर त्या कृतीला आवश्यक असते किंवा नाही, हा प्रश्न आपण मांडू शकतो. याला निगडित विधान असे : जर भाषांतर एक आकृतिबंध असेल, तर भाषांतराच्या शक्यतेची अट ही काही विशिष्ट कृतींच्या अस्तित्वातच अंतर्भूत असते.

'भाषांतराची शक्यता' हा काही विशिष्ट कृतींचा आवश्यक गुणधर्म आहे. याचा अर्थ असा नाही, की त्यांना आत्मतःच भाषांतराची गरज असते, पण एवढाच, की मूळ, आद्यकृतीतील एक विशिष्ट अर्थ त्यांच्या भाषांतराच्या शक्यतेत व्यक्त होतो. यामुळे आपल्याला हे स्पष्ट दिसून येते, की एखादे भाषांतर -मग ते कितीही चांगले असले, तरी मूळ, आद्यकृतीसाठी महत्त्वाचे नसते. तरीही भाषांतराचे मूळ, आद्यकृतीशी अतिशय जवळचे नाते असते. कारण मूळ, आद्यकृती भाषांतरणीय असते. मूळ,

आद्यकृतीसाठी भाषांतर महत्त्वाचे नसते, म्हणूनच खरोखर हे नाते अत्यंत जवळचे असते. या नात्याला नैसर्गिक, किंवा अधिक काटेकोरपणे, जैविक (जीवनाशी निगडित) बंध म्हणता येईल. जशा जीवनाच्या अभिव्यक्ती जिवंत वस्तूंशी अगदी अंतर्गतरीत्या बांधलेल्या असतात, पण जिवंत वस्तूंसाठी महत्त्वाच्या नसतात, त्याच प्रकारे मूळ, आद्यकृतीमधून भाषांतर जन्म घेते, पण तिच्या जीवनातून नव्हे, तर तिच्या 'उत्तर-जीवना' तून भाषांतर जन्म घेते. भाषांतर मूळ, आद्यकृतीच्या नंतरच येत असल्याने ज्या मूळ, आद्यकृतींना त्यांच्या निर्मितीच्या काळात योग्य भाषांतरकार मिळाले नाहीत अशा मूळ, आद्यकृतींच्या अजूनही चालू असलेल्या जीवनातील एक टप्पा दर्शवते; आणि कलाकृतींचे जीवन आणि उत्तर-जीवन हे रूपकात्म न समजता साधे वास्तव म्हणून समजले पाहिजे. जेव्हा विचार अतिशय संकुचित होता, अशा काळात देखील 'जीवन' केवळ जैविक पदार्थापुरतेच मर्यादित आहे, असे समजले जात नसावे, असे वाटते. 'जीवनाची' विस्तृत व्याप्ती 'आत्म्याच्या' अक्षम आधिपत्याखाली आणून- जसे करण्याचा फेखनरचा प्रयत्न होता-त्याला मर्यादा घालणे शक्य नाही, असे वाटते; आणि जीवांच्या अनुभवाचे - संवेदनांचे प्रसंग, ज्यांची जीवनाला तुटकच जाणीव असते-असे प्रसंग जीवनाची व्याख्या करण्यासाठी अगदीच अपुरे पडतात. वस्तुतः या संकल्पनेला तिला योग्य महत्त्व तेव्हाच मिळते, जेव्हा इतिहासाच्या सातत्याच्या दृष्टिकोनातून दिसणाऱ्या वस्तूंमध्ये -त्या पदार्थापुरतेच मर्यादित न ठेवता- जीवनाचे अस्तित्व ओळखले जाते. कारण निसर्ग किंवा स्वभाव नव्हे, संवेदना आणि आत्म्याचा तुटकपणा तर नव्हेच नव्हे, तर इतिहासच फक्त 'जीवनाची' व्याप्ती निर्धारित करू शकतो. आणि इथे तत्त्वज्ञाला त्याचे कर्तव्य आणि उत्तर-दायित्व सापडते. संपूर्ण नैसर्गिक जीवन इतिहासाच्या सर्वव्यापी आयुष्याद्वारे समजून घेण्याचे कर्तव्य आणि उत्तर-दायित्व. आणि कलाकृतींच्या जीवनाचे सातत्य समजून घेणे जीवांच्या जीवनाचे सातत्य समजून घेण्यापेक्षा नक्कीच सोपे आहे. श्रेष्ठ कलाकृती त्यांच्या कर्त्यांच्या काळातील त्यांची निर्मिती आणि नंतरच्या काळातील त्यांच्या जीवनाचे सातत्य- जे अकालबधित असते- त्यातही स्वतःची वंशपरंपरा शोधू शकतात. जेव्हा असे घडते, त्यांच्या जीवनाच्या सातत्यात त्यांची वंशपरंपरा शोधली जाते, तेव्हा त्याला प्रसिद्धी म्हणतात. एखादी कलाकृती जेव्हा तिच्या जीवनाच्या सातत्यात तिच्या प्रसिद्धीच्या युगापर्यंत पोचते, तेव्हा माहितीचे वहन करण्यापलीकडे, अधिक काही तरी करणारी भाषांतरे घडतात. निकृष्ट भाषांतरकार म्हणतात, त्याप्रमाणे भाषांतर मूळ, आद्यकृतीची प्रसिद्धी वृद्धिंगत करत नाही, तर उलटपक्षी, भाषांतर पूर्णपणे या प्रसिद्धीवर अवलंबून असते. भाषांतरात आद्यकृतीचे पुनः पुनः घडणारे, सर्वांत नूतन आणि परिपूर्ण जीवन उलगडले जाते. हे असे उलगडले जाणे एका विवक्षित, विशेष आणि उच्च प्रतीच्या जीवनाच्या उलगडण्यासारखे उलगडले जाणे आहे. ते एका विशेष

आणि उच्च हेतूने निर्धारित झालेले असते. जीवन आणि तर्कशुद्ध हेतू या दोन संकल्पना परस्परावलंबी आहेत, हे उघड आहे, पण त्यांचे आकलन आपल्याला दुर्लभ असते. किंबहुना, जेव्हा आपण 'हेतू' चा विचार एखाद्या विशिष्ट आणि आत्मनिष्ठ 'उद्दिष्टा'च्या अंगानेच न करता अधिक सामान्यतः आणि एका उच्च विश्वात करतो, तेव्हाच त्यांचे आकलन होते. जीवनाच्या सर्व हेतुपूर्ण घटना सामान्यतः त्यांच्या तर्कशुद्ध हेतूंप्रमाणे-हेतुपूर्ण असतात, त्या शेवटी केवळ जीवनापुरत्याच नव्हे, तर त्यांच्या सत्त्वाच्या अभिव्यक्तींचे पुनश्चित्रण, त्यांच्या संपूर्ण अर्थाचे पुनश्चित्रण यांच्या आधारे हेतुपूर्ण असतात. तसेच भाषांतराचा हेतू-अंतिम हेतू- हा भाषांमधली सर्वांत आतली, अंतर्गत नाती व्यक्त करणे हा असतो. ही दडलेली नाती भाषांतर आत्मतःच दर्शवू शकत नाही किंवा निर्माण करू शकत नाही, परंतु त्यांचे बीजात्मक किंवा अंतर्व्यवहारात्मक पुनश्चित्रण करू शकते. वस्तुतः त्या आंतरिक नात्यांची त्यांच्या बीजापासून पुनर्निर्मिती करण्याच्या प्रयत्नातून घडणारे हे पुनश्चित्रण अतिशय विशेष प्रकारचे असते, आणि ते पूर्णपणे जीवनाच्या भाषिक अंगापुरतेच मर्यादित असते. इतरत्र, इतर अर्थप्रकारांत, अर्थव्यवहारांत चिन्हे, साम्य, इत्यादी संकल्पना वापरल्या जातात.

अपेक्षा आणि अप्रत्यक्ष उल्लेखाद्वारे घडणारा अंतर्व्यवहार नव्हे; पण निरनिराळ्या भाषांतील आंतरिक संबंध म्हणजे एक विशिष्ट प्रकारचे संमीलन असतात. संमीलन असे, की, भाषा एकमेकांना परक्या नसतात, आणि त्यांच्यांतील ऐतिहासिक संबंध वगळले, तरी या भाषा त्या काय सांगू इच्छितात, याद्वारे एकमेकांशी संबद्ध असतात.

हे सर्व स्पष्टीकरण करण्याच्या प्रयत्नात आपला प्रश्न निरनिराळ्या वाटावळणांतून पुन्हा भाषांतराच्या परंपरागत सिद्धांतनाकडे येऊन पोचला, असे वाटण्याची शक्यता आहे. भाषांची आंतरिक नाती मूळ, आद्यकृतीचा आकृतिबंध आणि अर्थ शक्य तेवढ्या काटेकोरपणे वाहून नेणे यापलीकडे भाषांतराद्वारे कशी सिद्ध होणार? परंतु परंपरागत सिद्धांतनात या काटेकोर वहनाची काटेकोर संकल्पना साध्य झाली नाही, आणि त्यामुळे परंपरागत सिद्धांतन भाषांतराच्या सत्त्वाचे काहीही वर्णन शेवटी करू शकले नाही. भाषांतील नातेसंबंध दोन साहित्यकृतींतील वरवरच्या आणि व्याख्या न करता येणाऱ्या साम्यापेक्षा काही तरी अधिक असे असतात आणि अधिक खोलवरचे असतात, हे भाषांतरात सिद्ध होते. भाषांतर आणि मूळ, आद्यकृती यांतले संबंध समजून घेण्यासाठी एक विशेष पद्धती आणि एका विशेष साध्याची आवश्यकता असते, आणि ही पद्धती ज्ञानशास्त्राने (epistemology) भाषांच्या चित्रसिद्धांताची अशक्यता ज्या पद्धतीने दाखवली पाहिजे, त्या पद्धतीशी साम्य राखणारी पद्धती असेल. जर ज्ञानशास्त्राने दाखवून दिले, की ज्ञान वस्तुनिष्ठ असू शकत नाही, आणि फक्त वास्तवाच्या चित्रांचेच बनलेले असले, तरी ज्ञान वस्तुनिष्ठ





अनुक्रमणिका

आहे, असे म्हणता येत नसेल; तर भाषांतराच्या सत्त्वाचे आणि अस्तित्वाचे अंतिम ध्येय मूळ, आद्यकृतीशी साम्य राखणे हे असले तर भाषांतर शक्यच होत नाही, हे दाखवून देणे शक्य आहे. कलाकृतीच्या जीवनाच्या सातत्यात- शिवाय तिच्या स्वरूपात घडणारे बदल आणि एका जीवन-शक्तीचे पुनर्निर्माण वगळून तिच्या जीवनाच्या सातत्याबद्दल कसे बोलणार?- तिच्या जीवनाच्या सातत्यात मूळ, आद्यकृती बदलते. शब्द जर दृढपणे लिहिलेले असतील, तर तेदेखील हळूहळू पक्क होतात. लेखकाच्या काळात जो त्याच्या साहित्यिक भाषेचा विस्तार, जे प्रसरण असेल, ते नंतर पूर्णपणे कार्यरत होऊ शकते, निर्माण केलेल्या कलाकृतीतील विस्ताराच्या अव्यक्त अंतर्गत शक्यता वास्तवात येऊ शकतात. जे एकेकाळी नवीन होते, ते बेचव वाटू शकते, जे चलनी होते, ते पुराणे वाटू शकते. अगदी ढोबळ मनोव्यवहारनिष्ठ विचारांसाठी जागा ठेवली, तरी अशा या बदलांचे आणि तितक्याच अविरतपणे घडणारे अर्थातील बदल यांचे सत्त्व नंतर येणाऱ्या पिढ्यांच्या आत्मनिष्ठतेत शोधले, तर घोटाळा, गल्लत होते. एखाद्या वस्तुस्थितीचा आधार व अंतर्वस्तू (substance) यांची गल्लत. एवढेच नव्हे, तर अधिक कठोरपणे म्हणावयाचे, म्हणजे असे, की, वरील बदलांचा नंतर येणाऱ्या पिढ्यांच्या आत्मनिष्ठतेत शोध घेणे म्हणजे एक विलक्षण आणि निर्मितिक्षम प्रक्रिया बौद्धिक कमतरतेपोटी अमान्य करणे आहे. आणि लेखकाच्या लेखणीचा शेवटचा फटकारा म्हणजे कृतीचा सर्वोत्तम आणि अंतिम वार मानला, तरी देखील भाषांतराचे जुनाट सिद्धान्त, वाचवणे शक्य होत नाही, कारण शतकांच्या प्रवाहात श्रेष्ठ साहित्यकृतींचा सूर आणि अर्थ पूर्णपणे बदलतो, आणि भाषांतराकाराची भाषादेखील बदलते. खरोखरच, लेखकाचे शब्द त्याच्या स्वतःच्या भाषेत जिवंत राहतात, पण सर्वोत्तम भाषांतरदेखील भाषांतरकाराच्या भाषेच्या वाढीत हरवून जाते, आणि तिच्या जीवनाच्या सातत्यातही हरवून जाते, हे नियत आहे. दोन मृत भाषांच्या बहिऱ्या, अक्षम समीकरणापासून भाषांतर फार दूर असते. देवाणघेवाणीच्या सर्व पद्धतींतील भाषांतर ही एक अशी पद्धती आहे, की जी स्वतःच्या भाषेतील बदलांची गती व धडधड आणि परक्या भाषेच्या पक्क होण्याच्या प्रक्रियेशी सर्वांत अधिक निगडित असते.

जर भाषांतरात भाषांतील संबंध स्पष्ट होत असतील, तर ते पुनर्निर्मित कलाकृती आणि मूळ, आद्यकृतीतल्या अस्पष्ट साम्यापेक्षाही इतर काही कारणाने स्पष्ट होतात. अर्थातच, साम्यात नातेसंबंध अंतर्भूत असतीलच, असे नाही. नातेसंबंधाची ही कल्पना इथे तिच्या मर्यादित अर्थाशी सुसंगत आहे, कारण उगमस्थानाचे एकच असणे ही नातेसंबंधांची व्याख्या सर्वव्यापी ठरत नाही, तरीदेखील नातेसंबंधांच्या मर्यादित कल्पनेसाठी उगमस्थानाची संकल्पना आवश्यक आहे. ऐतिहासिक संबंध वगळले, तर दोन भाषांचे काय नाते असू शकते? शब्दांतील साम्य किंवा दोन साहित्यकृतींतील साम्यापुरतेच ते मर्यादित नसते.

किंबहुना, भाषांचे ऐतिहासिक व्युत्पत्तीच्या पलिकडचे सर्व संबंध यावरच आधारलेले असतात, की प्रत्येक भाषेमध्ये, व्यक्तिशः एकच एक व तीच गोष्ट उद्देशित असते, मात्र प्रत्येक भाषेला ती व्यक्तिशः आणि स्वतंत्रपणे लाभू शकत नाही; ती लाभू शकते केवळ भाषांच्या परस्परपूरक उद्देशातूनच, ज्यांना आपण एक शुद्ध, वैश्विक भाषा म्हणू शकतो. एकमेकांना परक्या असलेल्या भाषांतील सर्वच घटक - शब्द, वाक्य, संदर्भ - परस्परभिन्न असतात, पण त्यांच्या उद्देशात ते परस्परपूरक असतात. हे समजून घेण्याची इच्छा - भाषेच्या तत्त्वज्ञानाचा मूळ नियम - ही इच्छा, अभिलाषा काय उद्देशित आहे, आणि कसे उद्देशित आहे, कुठल्या पद्धतीने, या दोन्हींत फरक करण्याच्या हेतूमध्ये दिसून येते. जर्मन 'ब्रॉट' आणि फ्रेंच 'पें' या दोन्हींत एकच पदार्थ (ब्रेड) उद्देशित असतो, पण एकाच पद्धतीने नाही. अर्थपद्धतीच्या भिन्नतेमुळे या दोन शब्दांचे जर्मन आणि फ्रेंच माणसांसाठी दोन वेगळे अर्थ होतात, ते एकमेकांऐवजी वापरता येत नाहीत. हे दोन अर्थ, खरेतर, एकमेकांना वगळूनच आकार घेतात, पण काय अर्थ होतो ('ब्रेड' हा पदार्थ) यामुळे, अर्थाच्या एकात्मतेमुळे, अर्थ एकच असतो. अशा प्रकारे अर्थपद्धती जरी परस्परभिन्न असली, तरी ज्या भाषांतले हे शब्द आहेत, त्या भाषा परस्परपूरक असतात. या भाषांमध्ये वस्तुतः अर्थपद्धतीचा अर्थवस्तूतच अंतर्भाव असतो. म्हणजेच, जसे एखाद्या विशिष्ट शब्दात किंवा वाक्यात अर्थाला जसे सापेक्ष स्वातंत्र्य असते, तसे सापेक्ष स्वातंत्र्य परस्परपूरक संबंधांचा अभाव असलेल्या भाषांमध्ये नसते, तो तोपर्यंत सतत बदलता असतो -जोपर्यंत या सर्व अर्थपद्धतींच्या सुसंवादातून अर्थ हे वैश्विक भाषा म्हणून उदयाला येत नाहीत. असे होईपर्यंत ते विशिष्ट भाषांमध्ये दडलेले असतात. पण जर ते असे त्यांच्या इतिहासाच्या प्रेषित अंतापर्यंत (messianic end) वाढत राहिले, तर मात्र भाषांतर 'पेट घेते', कृतींच्या जीवनाच्या सातत्यात आणि पुनर्निर्मितीत, पुन्हा पुन्हा भाषेच्या पवित्र वाढीची परीक्षा घेत आणि जे दडलेले आहे, ते प्रकट दर्शनापासून किती दूर असेल, किती सुस्पष्ट असेल ,या दूरत्वाची, अंतराची जाणीव!

तळटीपा :

१) मला जर्मन येत नाही, हे इथे नमूद करणे माझे कर्तव्य आहे. कसेबसे वाचता येते. या सुलभ भाषांतराची सुलभता साध्य करण्यात प्रा. अशोक केळकर आणि प्रा. ऊर्मिला भिर्डीकर यांचा सहभाग मिळाला. याच लेखाच्या दुसऱ्या, अधिक काटेकोर भाषांतराचे उतारे घेऊन नंतर केव्हातरी चर्चा करीनच. प्रस्तुत भाषांतराचा मुख्य उद्देश बेन्यामिनचा विचार वाचकांपर्यंत पोचवणे एवढाच आहे. बेन्यामिनचा विचार - जो मुळातच दुर्गम्य आहे, मराठीत उतरवण्याच्या प्रयत्नात अगम्यच झाला असल्याचीही शक्यता आहे. या सर्व मुद्द्यांवर भाषांतराचा उर्वरित भाग प्रसिद्ध झाल्यावर चर्चा होईल. भाषांतरासाठी प्रोत्साहन देणाऱ्यात प्रा. कल्याण काळे आणि प्रा. राजीव पत्के अग्रगण्य आहेत. जर्मन आणि इंग्रजी संहिता मिळवून देण्यासाठी

केलेल्या कष्टांसाठी पुढील व्यक्तींचे आभार : अनुपमा राव, तिची अनामिक मैत्रीण, वाचनालयातून घेतलेले पुस्तक मागणीनुसार त्वरित परत करणारी अनामिक व्यक्ती (सर्व शिकागो), आणि कैलास आवटी (ऑस्ट्रेलिया) भाषांतर करण्याची विनामूल्य परवानगी दिल्याबद्दल suhrkamp verlag, बेन्यामिनचे प्रकाशक, यांचे मनःपूर्वक आभार.

२) भाषांतरासाठी वापरलेल्या संहिता अशा :

(क) Walter Benjamin, "Charles Baudelaire Tableaux Parisiens : Deutsche Übertragung mit einem Vorwort über die Aufgabe des Übersetzers,

Gesammelte Schriften IV 1, Herausgegeben von Tillman Rexroth, Suhrkamp Verlag, 1972, (pp.9-21)

(ख) Walter Benjamin, "Die Aufgabe des Übersetzer,"

Illuminationen : Ausgewählte Schriften, Suhrkamp Verlag, 1968, (pp. 56-69)

(ग) Walter Benjamin, "The Task of the Translator," translated by James Hynd and E.M.Valk, Delos : a Joumal on and of Translation, 2(1968) pp. 76-98.

(घ) Walter Benjamin, "The Task of the Translator, an Introduction to the Translation of Baudelaire's TABLEAUX PARISIENS", Illuminations, translated by Harry Zohn; Harcourt Brace Jovanovitch, 1968; Jonathan Cape, 1970, 69-82.

वरील पैकी 'ग' आणि 'घ' मध्ये अर्थातच फरक आहेत. डेलॉस मधले भाषांतर कमी परिचयाचे असले, तरी अधिक काटेकोर आहे, असे वाटते. भाषांतरासाठी आणि बेन्यामिनचा विचार समजून घेण्यासाठी उपयुक्त ठरलेल्या लेखग्रंथादींची यादी दुसऱ्या भागाला जोडण्यात येईलच. या भाषांतरात व पूर्वोक्त 'दुर्गम्य' भाषांतरात काय फरक आहे, याची त्या भाषांतरावर भाष्य देऊन चर्चा करण्यात येईल. दरम्यानच्या काळात हे मराठी भाषांतर सादर करत आहे.

इंग्रजी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ७.

❐❐

**कानी पडलेला संवाद**

'तुमचं जयमल्हार शिनिमातलं काम आवडलं बगा!'
'अहोपण तुम्ही जयमल्हारमधे पाह्यला तो मी नव्हं तो चंद्रकांत.'
'म्हंजे तुमचा भाऊच की नाई. ते काई पन म्हना तुमचं काम लइ बेष्ट हां!'
'सूर्यकांत मांढरे (आणि तर्कशास्त्र) यावर काय बोलणार?

पुनर्भेट

# दूरचित्रवाणी : भोगवट्यासाठी की शिणवट्यासाठी?

शांतिलाल भंडारी

पुण्याच्या 'संचार माध्यम विचार मंच' ने वृत्तपत्रातील एका प्रकटनाद्वारे महाविद्यालयीन विद्यार्थी-विद्यार्थिनींना निबंध लेखनासाठी आवाहन केले होते. निबंधासाठी विषय दिला होता 'दूरचित्रवाणी व इतर प्रचार माध्यमांवरील दाखविले जाणारे बीभत्स कार्यक्रम, त्यांचे होणारे परिणाम व ते थांबविण्यासाठी करावयाची उपाययोजना.' या निबंधलेखनात उत्कृष्ट ठरणाऱ्या निबंधासाठी पारितोषिके देण्याचेही घोषित करण्यात आले होते.

दूरदर्शन व त्यावरून प्रसारित होणारे कार्यक्रम हा तसा आजचा कळीचा विषय असून तो मानवी जीवनाशी निःसीमपणे आणि दृढपणे जोडला गेलेला आहे. 'दूरदर्शन' म्हणजे शासनाच्या अखत्यारीतली दूरचित्रवाणी केवळ नव्हे, तर या मर्यादेबाहेरच्या झी, स्टार, एम,एन् टी, जैन, केबल आदी सर्वच 'टी.व्ही. चॅनल्स' चा यांत अंतर्भाव होतो. या सर्वांचा उल्लेख 'दूरदर्शन' हे प्रथम स्थानावर आणि प्रतिनिधिक असल्याने, 'दूरदर्शन' असाच सामुदायिकरीत्या करणे सर्व समावेशक तसेच व्यावहारिकही ठरते. असे हे विराट दूरदर्शन. 'विराट विश्वदर्शना' प्रमाणे भव्यदिव्य असल्याने मानवाला याचे अप्रूप आणि आकर्षणही.

दूरदर्शन ही विसाव्या शतकातली आश्चर्यजनक उपलब्धी असल्याने करमणूकप्रधान दूरदर्शनचे कुतूहल व आकर्षण मानवी मनाला वाटणे साहजिकच आहे आणि या आकर्षणातून मनोरंजनाचा सोस वाढीला लागणेही क्रमप्राप्त आहे. असा हा सोस ज्याप्रमाणे भरणपोषण करू शकतो, त्याप्रमाणे तो शोषणही करू शकतो. सोस या शब्दातच शोषण अभिप्रेत आहे. म्हणूनच दूरदर्शनसारख्या प्रसार माध्यमावरील कार्यक्रम एक जटिल समस्या बनून मानवी मनाला भ्रांत करते. या भ्रांतीचा जेव्हा अतिरेक होतो, तेव्हा सत्पवृत्त माणूस श्रांत होऊन आपोआपच अंतर्मुख होतो आणि साधकबाधक विचार करण्यास प्रवृत्त होतो. दूरचित्रवाणी व इतर प्रसार माध्यमांवरील दाखविले जाणारे बीभत्स कार्यक्रम, त्यांचे होणारे परिणाम व ते थांबविण्यासाठी करावयाची उपाययोजना यांसारखे विषय मग विचारमंचावर येतात

आणि त्यावर चिंतनमंथन सुरू होते.

'संचार माध्यम विचार मंचा' ने निबंध लेखनासाठी युवा पिढीला केलेले आवाहन याच भूमिकेतून आणि व्यथेतून झालेले आहे. युवा पिढीचे प्रतिनिधित्व करणारे महाविद्यालयीन युवक आणि युवती यांनी समाजाच्या स्वास्थ्याशी, कुशलक्षेत्राशी आणि हिताहिताशी संबंधित असलेल्या या विषयावर भाष्य करावं हा - निबंध लेखनासाठी झालेल्याआवाहनामागचा प्रांजळ हेतू आहे. युवापिढी तशी संस्‍ ारक्षम असते तरी ती विचारक्षमही असते, म्हणूनच हा विषय तसा अधिकतर युवा ढीच्या जिव्हाळ्याचा आहे.

जे निबंध आले त्यांचे परीक्षण करताना एक गोष्ट प्रकर्षाने जाणवली ती ही, की निबंधलेखनाचे मर्मच बहुतेकांना नीटसे उमजलेले नाही. त्यामुळे विषयाचे मर्म सम पणे उकलून दाखवणे त्यांना जवळजवळ अशक्य झालेले आहे.

बाह्यरंगी असलेला निबंध हा वाङ्मय प्रकार असा लघुनिबंधाच्या साहित्य रूपाने अंतरंगी शिरल्याने तो अंतर्मनाशी सलगी करू लागला. ही जवळीक अंतःपुरातल्या जवळिकीसारखी असल्याने हिच्यातली स्निग्धता, गोडी भावणारी होती, पण पुढेपुढे अंतःपुरातला ओलावा हा आटत जावा तसा हा साहित्य प्रकार निस्तेज होत गेला. याचे जे काही अस्तित्व उरले, ते विद्यार्थी जीवनात आणि त्यांच्या परीक्षार्थी अभ्यासक्रमात. लघुनिबंधातील लघुता निघून जाऊन ही अशी यांच्या वाट्याला आली. 'लातूर पॅटर्न' ने तर शालेय निबंधाला ठोकळेबाजपणा-बरोबरच आणखी ठेंगणेपण बक्षीस दिले. संयोजकांनी महाविद्यालयीन विद्यार्थी-विद्यार्थिनींना निबंधलेखानासाठी आवाहन केले त्यामागचे एक मर्म, विझत चाललेली ज्योत तग धरून राहावी, असेही बहुधा असावे.

आजची नवी पिढी जुन्या पिढीच्या तुलनेत अधिक प्रगल्भ असल्याचे जाणवते आणि ही केवळ समजूत नाही, तर वस्तुस्थिती आहे. ज्ञानाच्या कक्षा सर्वांगांनी विस्तारत गेल्याने ही प्रचुरता नव्या पिढीच्या वाटणीला आलेली आहे. अर्थातच नव्या पिढीतील युवक युवतीकडून दूरदर्शनसारख्या त्यांच्या आत्मीयतेच्या आणि अस्मितेच्या विषयावर प्रतिभासंपन्न निबंधाची अपेक्षा करणे कदापिही चूक ठरत नाही. भाषेची शुद्धता आणि ललितरम्यता यासाठी अवश्य अपेक्षित.

अनेक वाहिन्यानी समृद्ध झालेल्या दूरदर्शनने एवढे विराट रूप धारण केले असल्याने 'संचार माध्यम विचार मंचा' ने दिलेल्या विषयावर महाविद्यालयातील तरुण-तरुणींकडून विराट दर्शन घडेल, अशी अपेक्षा होती, पण तसे काही घडले नाही. विवेचन व प्रकटीकरण यथातथाच.

टी.व्ही. ला 'इडियट बॉक्स' म्हणून काहीजण संबोधतात. 'इडियट बॉक्स' म्हणजे वेड लावणारी पेटी, खूळ लावणारा डबा, चळ भरवणारे डबडे. निबंधासाठी दिलेल्या विषयाची खरीखुरी ओळख करून देणारी ही संज्ञा असूनही हिच्याकडे

केवळ एकाचेच लक्ष गेलेले आहे. एकानेच हिचा उल्लेख केला आहे. कुणीतरी दूरदर्शनला 'धूरदर्शन' म्हणेल, अशी अपेक्षा होती. अगदी नेमके हेच शब्द यायला पाहिजेत असे नव्हे, तर अशा धाटणीची शब्दयोजना करून थोडक्या आणि नेमक्या शब्दांत मोठा आशय व्यक्त करता आला असता आणि यातून दूरदर्शनचे विराट नव्हे, विक्राळ दर्शन घडवता आले असते.

बीभत्स कार्यक्रमांच्या संदर्भाने कोणी तरी दूरदर्शनला 'ऊरदर्शन' म्हणेल असेही वाटत होते. दूरचित्रवाणीवरून जी चित्रपटगीते आणि अन्य काही उत्तान मालिका प्रसारित आणि प्रदर्शित होतात, ती ऊरदर्शने नाहीत तर काय आहेत असे विचारता येण्यासारखे आहे. हॉरर शो, रहस्य आदी देमार मालिका दूरदर्शन हे शूर-दर्शन (शौर्यदर्शन) आहे की क्रूर-दर्शन (क्रौर्यदर्शन) आहे, असेही विचारण्यास भाग पाडतात. असे काही विचारण्यात अर्थातच धाडसापेक्षा औचित्याचाच भाग अधिक असतो. व्यक्ती, समाज, देश यांविषयी वाटणारी आस्थाही यामागे असते.

शृंगार हा रसांचा राजा आहे. स्वतःचा आणि इतरांचा शिणवटा दूर व्हावा म्हणून सोळा शिणगार केले जातात. भोग आणि उपभोग हे शब्द वरवर समानअर्थी असले तरी त्यात अंतर्भेद निश्चित आहे. भोगात विलास अभिप्रेत असल्याने तो विनाशाकडे नेऊ शकतो तर उपभोग उपयोगसापेक्ष असल्याने त्यातून विकास अपेक्षिला जातो. शिणवट्याच्या सोबतीला भोगवटा येतो, नाही असे नाही; पण स्त्री केवळ भोगवट्यासाठी सोळा शिणगार करीत असेल तर मग अशी स्त्री गरती राहत नाही, तर गणिका ठरते. दूरचित्रवाणीने कोणती भूमिका बजवायची हा खरा आजचा प्रश्न आहे. शिक्षण आणि प्रबोधन अशासारख्या क्षेत्रातल्या भूमिका निभावण्याचे उत्तरदायित्व दूरचित्रवाणीवर आहे, असे विद्वज्जन मानतात आणि हे सारे जनांना मान्य व्हावयास प्रत्यवाय नसावा, पण दूरचित्रवाणी भोगवट्यासाठी की शिणवट्यासाठी याचा विचार प्रस्तुत विषयात अधिक महत्त्वाचा आहे. कारण हा विषय व्यक्तीशी म्हणून समष्टीशी, युवाशक्तीशी म्हणून राष्ट्रशक्तीशी निगडित आहे.

दूरचित्रवाणीवरचे उत्तानदर्शन थकल्या भागलेल्या मनाचा आणि शरीराचा शिणवटा दूर करण्याऐवजी कामवासना उद्दीपित करते. असे वासनाकुंड चेतवणारे आणि भडकवणारे दर्शन शृंगारदर्शन न राहता अंगारदर्शन ठरते. अशाने सामाजिक अधःपाताबरोबरच व्यक्तिगत शक्तिपातही होतो. वाणी हे सरस्वतीचे एक रूप आहे, याचाच आज विसर पडलेला आहे.

अश्लीलतेपासून दूर राहिलेली वृत्तपत्रे आदी नियतकालिके, आकाशवाणी अशा प्रसार माध्यमांनी या विषयात थोडे तारतम्य राखले आहे ही तशी जमेची आणि समाधानाची बाब आहे. निबंधात अशा धर्तीच्या विचारांची पेरणी व्हावयास हवी होती; पण अशी डूब कुणाला घेता आली नाही अथवा विचारांची झेपही कुठे दिसली नाही. गगनझेप घेण्याची क्षमता असलेल्या नव्या युवापिढीला गरुडझेप घेता आली पाहिजे.





अनुक्रमणिका

अधःपतन रोखण्यासाठी हे आवश्यक आहे.

प्रत्येक वस्तूला अनेक कंगोरे कडा असतात. त्याचप्रमाणे प्रत्येक नाण्याला दोन बाजू. दूरचित्रवाणीवरील जाहिरातीविषयी अनेक आक्षेप घेतले जातात; पण काही काही जाहिराती बुद्धीला चालना आणि थकल्या भागल्या मनाला तजेला देतात, म्हणूनच साड्यांच्या डबड्यांचे ओझे 'चले' या एका चैतन्यमय शब्दाने अंगाखांद्यावर लीलेने वागवले जाते. साबणाच्या फेसाळणाऱ्या जाहिराती 'चाय लेंगे?' या प्रश्नासरशी 'अंहं सिर्फ पचीस रुपये' अशी मागणी होताच ती किंमत देऊन 'दाग ढूँढते रह जावोगे' चा लपंडाव खेळायला लावतात. अशी ही 'अंदर की बात है', जी माणसाला अंतर्बाह्य फुलवायला पुरेशी आहे. त्यासाठी कवीचं मन आणि आस्वादकाचं भान असणं अगत्याचं आहे.

प्रत्येक ढगाला एक रुपेरी कड असते. काळ्या ढगाला अशी रुपेरी झालर लावणारा तेजोगोल त्या ढगाआड लपलेला असतो. दूरचित्रवाणी तशी काळाची गरज आहे. त्यामुळे या काळ्या ढगाच्या भयानक बीभत्स रूपाप्रमाणेच त्याला झगमगणाऱ्या रुपेरी सोनेरी कडांचा वेध घेणेही तितकेच गरजेचे व महत्त्वाचे ठरते. दूरचित्रवाणी जरी अनेकांना शापवाणी ठरत असली तरी वृद्धांना ती, जरी या 'इडियट बॉक्स' कडून काहींना म्हातारचळ लागण्याची भीती संभवत असूनही, एक प्रकारचे वरदान ठरत आहे. अशा काही उजळ कंगोऱ्यांवर अधिक प्रकाश टाकता येण्यासारखा असूनही असा प्रयत्न निबंधकार युवक युवतींनी केलेला नाही. संयोजकांनी दिलेल्या विषयाचे बोट धरूनच लेखन प्रवास झाल्याने तो थोडा पूर्वग्रहप्रेरित आणि थोडा पूर्वग्रहदूषित झालेला आहे. असा झापडबंद आणि चाकोरीबद्ध प्रवास का होतो, आकलन आणि विश्लेषण यांचे तोकडेपण का जाणवते, याला काही कारणेही आहेत.

'होय-नाही' अशी मर्यादित उत्तरे परीक्षार्थी युवापिढीकडून जिथे अपेक्षिली जातात, तिथे आणि मातृभाषेपासून वंचित राहिलेल्या व 'कॉन्व्हेंट' संस्कृतीत अधिक तर शिक्षित झालेल्या नव्या पिढीकडून गगनचुंबी विचारांची अपेक्षा करणे यथायोग्य नसले तरी दूरचित्रवाणीवरील बीभत्स कार्यक्रमावर उतारा म्हणून काही ठोस उपाययोजना सुचवायला या तरुण हिंमतवान पिढीने हिरीरीने पुढे यायला कसलीच हरकत नव्हती, पण याही बाबतीत निबंध लेखक- लेखिकांनी अपेक्षापूर्ती केलेली नाही. वाचनाच्या आणि चिंतनाच्या अभावाचे हे फलित म्हणावे लागेल.

दूरचित्रवाणीवर पंधरा पैशांच्या पोस्टकार्डांनी कसा डोंगराएवढा धुमाकूळ घातलेला आहे, हे केवळ सर्वविदित नसून सर्वदृष्ट आहे. 'सुरभि', 'फिलिप्स टॉप टेन' 'फिल्मी चक्कर' अशा अनेक कार्यक्रमांतील प्रश्नांची उत्तरे हजारो-लाखो कार्डांद्वारे पाठविली जातात. पण दूरचित्रवाणीवरील बीभत्स कार्यक्रम थांबवा, अशी निषेधात्मक कार्ड पाठवण्याची उपाययोजना एकाही निबंधकर्त्याने सुचविली नाही. जळगाव वासनाकांडावर केवढे काहूर उठले हे सर्वश्रुत आहे; पण अशी वासनाकुंडे

जागजागी का धगधगतात आणि दूरचित्रवाणीवरील उन्मादक कार्यक्रम फुंकर घालून ती कशी चेतवितात याचा गांभीर्याने विचार करून किती महिला संघटनांनी दूरचित्रवाणीवरील बीभत्स कार्यक्रमाविरूद्ध किती वेळा आवाज उठविला आहे? शाळा-कॉलेजांत प्रवेश मिळविणे आजकाल कठीण झाल्याने विद्यार्थी संघटना मोर्चे बांधून रण गाजवतात, पण शाळा- कॉलेजातल्या पिढीला नासवणाऱ्या प्रसार माध्यमांविरूद्ध आजवर या संघटनांकडून कितीदा रान उठविले गेले? 'चोली के पीछे क्या है, चुनरी के नीचे क्या है' अशा गाण्यांविरूद्ध बंड पुकारलेल्या नेत्यांनीच या गाण्यात अश्लील, अभद्र असे काही नाही, असा निर्वाळा द्यावा, या मागचे राजकारण काय आहे? .....अशा अनेक गोष्टींचा शोधबोध घेण्यासारखा असूनही कोणी निबंधकर्त्याने घेतलेला नाही. असे अनेक उपाय सुचविता येण्यासारखे असूनही सुचविले गेले नाहीत. ज्यांना खरोखरच बीभत्स कार्यक्रमांची घृणा वाटते, एवढेच नव्हे तर असले कार्यक्रम बघताना शरमेने ज्यांची मान कळत न कळत खाली होते, अशांनी दूरचित्रवाणीवरचे हिडीस कार्यक्रम मुळीच पाहू नयेत. उलट अशांनी त्या 'इडियट बॉक्स' पुढून उठून निघून जावे ही तर सहज सुचणारी उपाययोजना. असे दृढदर्शन वैयक्तिक तसेच सामूहिक पातळीवर घडेल, राजकीय मतभेद विसरून या सामाजिक, सांस्कृतिक उत्थापनासाठी सर्वत्र शांततामय निदर्शने-प्रदर्शने होतील, तेव्हाच दूरचित्रवाणी सुधारू शकेल. यातून लूटमार, बलात्कार अशा अत्याचारांना पायबंद बसू शकेल आणि अशाने राष्ट्रीय हानी टळू शकेल.

दूरदर्शन फेम नलिनी सिंह या विदुषींनी मध्यंतरी दूरदर्शनवरील 'आय विटनेस' की अशाच कुठल्या नावाच्या मालिकेत वादग्रस्त सिनेगीतांवर एक फीचर (रूपक) केले होते आणि विशेष म्हणजे या कार्यक्रमात सिनेगीते प्रकर्षाने दाखवून दर्शकांना वारंवार दर्शनसुखात आणखी एका दर्शनसुखाची अविस्मरणीय भर घातली होती. ही तशी या विषयातली शोकांतिका की सुखांतिका, काय म्हणावे, हे ज्याचे त्यानेच ठरवावे. असे दर्शन दूरचित्रवाणीवरचे असले तरी दूरदृष्टीचे नव्हे, याचे भान सामान्य दर्शकांना तरी हवे. जाण जाण जिला म्हणतात, ती याहून वेगळी आहे.

(सकाळ (पुणे) ११.१०.१९९४ पृ.४ वरुन सौजन्याने)

❐❐

ज्याची त्याची प्रचीती

# सामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून मराठी भाषेचा अभ्यास

वसुधा माने

वरच्या शीर्षकातला सामान्य माणूस म्हणजे मी. मला मराठी भाषेचा अभ्यास करण्याची निकड कधी भासू लागली, याची मुद्दाम आठवण करण्याची गरज नाही, इतकी ती माझ्या मनात ताजी आहे.

ताजी आहे, असं म्हटलं, तरी त्याला अठरा-एकोणीस वर्षं उलटून गेली आहेत. मी लिहायला लागले १९६४-६५ मध्ये. तेव्हा काही मला आपली मातृभाषा नीट येत नाही, वगैरे जाणवलं नाही. भाषेचा फुलोरा, एकाच अर्थाचे विविध शब्द वापरणं वगैरे नवेपणाचं उंडारणं चालू होतं.

मग कधी तरी एक अस्वस्थपणा जाणवू लागला. 'ते' काहीतरी शब्दापल्याड उभं असतं व आपल्याला हसतं आहे, असा भास व्हायचा. मग 'ते' पकडण्यासाठी भाषा नीट यायला हवी, असं वाटलं. त्या वाटण्याचं मला आश्चर्य वाटलं. म्हणजे काय? मराठी तर माझी मातृभाषा. ती शिकायची, म्हणजे काय? हां, तसा एक व्याकरण नावाचा नीरस भाग त्यात असतो व तो शिकावा लागतो, हे मला प्राथमिक शाळेपासून माहीत होतं व परीक्षेतल्या गुणांच्या संदर्भात ते अगदी नगण्य असतं. हेही मला ठाऊक होतं. त्यापलीकडे भाषा शिकायची, म्हणजे काय?

मी मराठी विषय घेऊन एम.ए. ला नाव घातलं. बाकी सर्व ठीक जमलं; पण आठवा पेपर कोणता घ्यायचा, यावर अडलं. छंदोरचना मला नको होता. 'संशोधनपद्धती' मला मिळणार नव्हता. उरला शेवटी एक, 'मराठी व्याकरणाच्या (तील) समस्या'.

यांतील मूळ समस्या म्हणजे मला मराठी व्याकरणच फारसं येत नव्हतं. तर त्यालाही समस्या असतात, हे कुणाला ठाऊक असतंय्?

आश्चर्य म्हणजे, तेव्हांच्या प्रोफेसरांना देखील हा प्रकार अगम्य होता. आता मागे वळून पाहता या पेपरचं औचित्य समजतं. जे माणूस एम. ए. करता मराठीचा सांगोपांग अभ्यास करणार, त्यात पारंगत व्हायची इच्छा धरणार, त्याला तिच्या व्याकरणाचा अभ्यास असायला नको? पण विश्वविद्यालयातून देखील भाषा -

शिक्षणाची अवस्था तेव्हा तरी शाळकरी अवस्थेतच होती.

तर या विषयाची, त्यावरच्या पुस्तकांची (जी लिहिलीच गेली नसावीत) शोधाशोध करताना मला व्याकरण चक्क आवडू लागलं. ते वगळून किंवा क्षुल्लक मानून, लोक भाषा कशी काय शिकतात, याचंही आश्चर्य वाटलं. व्याकरणच आलं नाही, तर प्राचीन मराठीपासून ते आतांच्या भाषेपर्यन्तचा तिचा प्रवास आपण कसा समजून घेणार? निव्वळ संस्कृतचा आधार त्यासाठी उपयोगी पडत नाही. पण हे साधं तेव्हाच्या विद्वज्जनांना उमगलं नव्हतं असं दिसतं. त्याचं एक कारण असं दिसतं की भाषेच्या संदर्भातील प्रत्येक गोष्ट एक संस्कृतच्या तरी आरशात पाहायची किंवा इंग्रजीचा नव्यानं प्राप्त झालेला आरसा तरी वापरायचा, असा तेव्हा शिरस्ता होता - असावा.

हे सर्व इतक्या आवेगानं आठवायचं कारण म्हणजे, आता माझ्या समोर असलेलं श्री. रंगनाथ शामाचार्य लोकापुर यांचं 'ज्ञानेश्वरीकालीन मराठी भाषेवरील कन्नडचा प्रभाव.' एखादी कांदबरी वाचावी, तसं हे पुस्तक जरी मी वाचलं असलं तरी त्यावर लिहिण्याचा माझा दुरूनही अधिकार नाही. शिवाय ज्ञानेश्वरीचा देखील माझा अभ्यास वगैरे नाही. तरीही (किंवा म्हणूनच) या पुस्तकानं मी प्रभावित झाले. त्यातले काही दोष मला जाणवले, पण प्रश्न तो नाही.

या पुस्तकाच्या वाचनानं एक गोष्ट जाणवली. ती म्हणजे मराठी भाषेत वारंवार झालेली स्थित्यंतरं. तसंच काहीसं सध्या मराठी भाषेत चालू आहे व आता ओळखीची मराठी दुर्मीळ होऊ लागली आहे. परिणामी, ती मरते, की काय, अशी भीती बहुतेकांना पडली आहे. पण मला खात्री आहे, की हे तिचं एक जबरदस्त कात टाकणं असावं. नवी मराठी तरुण नागिणीसारखी सळसळत जेव्हा वावरू लागेल, तेव्हा आमच्या पिढीला ती कदाचित अगम्य भासेल.

नीड, ७८ पंचवटी वसाहत, तळेगाव दाभाडे-४१०५०६.

(मराठी व्याकरणातील समस्या या विषयावर लेखन झालेलेच नाही, 'अशी स्थिती नाही. वाचकांच्या माहितीसाठी सांगणे जरूर आहे. पाहाः मो. के. दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण, १९११, दुसरी १९२५, संपादित १९७०. या पुस्तकातील इतस्ततः येणारा बारीक टाइपातील 'ऊहापोह' मजकूर. कृ. श्री. अर्जुनवाडकर, मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद, पुणे १९८७-संपादक)

❐❐





अनुक्रमणिका

# 'वारी' आणि 'दिंडी': नवीन काही

पंडित आवळीकर

१) 'वारी' या शब्दाची व्युत्पत्ती आणि अर्थनिश्चिती करण्याचे प्रयत्न झाले आहेत. हा आणखी एक प्रयत्न. एक शक्यता सुचवणारा. 'कानड्या' विठ्ठलाशी सांस्कृतिक भाषिक अनुबंध गृहीत धरून. 'सण- वार' यासाठी कन्नड मध्ये 'हब्ब-हरिदिन' (गळु) असा जोडशब्द आहे. हब्ब < पब्ब < पूर्व यांसाखळीमधून आला आहे. हरिदिन म्हणजे एकादशी- या स्त्रीलिंगी छटेसाठी 'दिन'चे 'दिनी' झाले. याच पद्धतीने दिन/वार या अर्थाचे 'एकादशी' या स्त्रीलिंगाशी सुसंगत असे 'वारी' हे रूप झाले असावे. 'हरिदिन /वार' हे 'उपास' या सामान्य अर्थाचे शब्द कन्नड/मराठीत आजही प्रचारात राहिले, आणि 'एकादशी' या विशेष अर्थाचे 'हरिदिनी'. 'वारी' हे शब्दही त्या त्या उपासना संप्रदायात-माध्व आणि वारकरी- एक प्रकारे पंथाची परिभाषा बनले. 'वारी-करी', तो 'वारकरी' असा हा शब्द एकादशी व्रताचा आचार-धर्म जपत राहिला, असे मला वाटते. हब्बहरिदिन/सणवार या जोडशब्दांतील Feast and Fast यांचे विरुद्धार्थक (antonymous) घटक मराठी-कन्नड संस्कृतींच्या समान अंगावरही प्रकाश टाकतात.

२) 'दिंडी' चा शोध घेताना आपण पंढरपूरच्या 'दिंडीर-वनात हरवले जाऊन चालणार नाही. दिंडी (दरवाजा), दिंड (गाठोडे किंवा नागपंचमी दिवशी केला जाणारा उकडीचा गोड पदार्थ); शेतीचे एक अवजार; किंवा 'दिंडी' (एक वृत्त) या शब्दांच्या पसाऱ्यातूनही सुटायला हवे. पुन्हा शोधाला दिशा मिळते, ती कन्नड उपासना-प्रकाराची; परंपरेची.

माध्वांत, एखाद्या आचार्यांच्या प्रवासात, त्यांच्याबरोबर आचार्यांच्या नित्यपूजेतील देवही नेण्याची पुरातन प्रथा आहे. आचार्य, त्यांचे देव आणि त्यांचे देव वाहून नेणारे त्यांचे शिष्य/भक्त यांची ही एक मिरवणूकच असते. हे प्रवासी 'देव' आणि त्यांचे वाहक म्हणजे 'देव(रू)' आणि 'दिंड'(रू). या. दिंड' मंडळींची एका गावाहून दुसऱ्या गावाला चाललेली मिरवणूक म्हणजे 'दिंडी'. वारकऱ्यांच्या या प्रथेतही पालखी (देव) आणि पालखीवाहक आहेतच. 'दिंडनेर्ली' सारखे ग्रामनाम दिंडीच्या एखाद्या टप्प्याचे सूचक असावे आणि 'दिंडर' (दिंडांच्या 'र' हा षष्ठीचा प्रत्यय) वनात

म्हणजे पंढरपूरच्या 'दिंडीर' वनात अखेरचा मुक्काम होत असावा. 'दिंड' मध्ये मराठीच्या उच्चार प्रवृत्त्यनुसार महाप्राण मिसळून मराठीतली आजची 'धिंड' हीही विपरीतार्थक 'मिरवणूक'(च)!- 'धिंडवडे' काढत निघाली असावी.

मराठी विभाग, गुलबर्गा विद्यापीठ, गुलबर्गा.

❐❐

**व्याख्या**

एका सामुराईने (मध्ययुगीन जपानमधला शिलेदार) एका झेन भिक्षूला आव्हान दिले की त्याने स्वर्ग आणि नरक यांची व्याख्या करावी.

''तू म्हणजे एक रांगडा गडी - तुझ्यासारख्यावर मी आपला वेळ काही खर्च करणार नाही.''

अपमानित झालेला सामुराई तलवार उपसून भिक्षूच्या अंगावर धावून जात म्हणाला, ''तुझ्या या उद्धटपणाबद्दल मला तुझा जीवच घेता येईल!''

''यालाच तर म्हणतात नरक,'' भिक्षूने शांतपणे उत्तर दिले.

सामुराई एकदम थबकून विचार करू लागला. उत्तर तर मार्मिक होते. तलवार म्यान करून त्याने भिक्षूचे आभार मानले.

''हा स्वर्ग,'' पूर्वीच्या शांतपणे भिक्षूने म्हटले.





अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# शैलीशास्त्रज्ञ भामह : एक कसदार संशोधन

परीक्षण लेखक : मोहन धडफळे

(शैलीशास्त्रज्ञ भामह/ले.डॉ.वा.के.लेले, प्रका.-मानसन्मान प्रकाशन, पुणे १९९५)

संस्कृत काव्यसमीक्षा व तिच्या आसमंतातील औचित्यविचार, शैलीविज्ञान व शास्त्रीय ग्रंथलेखनाच्या तन्त्रयुक्ती, इत्यादी विषयांचा मूलग्राही अभ्यास करून सकस निष्कर्ष काढणाऱ्या संशोधकांमध्ये प्रा. डॉ. वा.के.लेले यांचा क्रम प्रथम श्रेणीतील ठरेल. गेली काही दशकं ते शास्त्रीय ग्रंथलेखन पद्धतीच्या प्राचीन भारतीय तंत्रयुक्त्या व आधुनिक पाश्चात्त्य 'स्टाइलिस्टिक्स्' मधील बहुचर्चित, अनेकविध तत्त्वांची प्रतिरूपं दाखवणारी प्राचीन भारतीय साहित्यसमीक्षेत विखुरलेली शैलीविज्ञानाची तत्त्वं यांचा प्रामुख्यानं अभ्यास करीत आहेत. मुख्यत्वे याच दोन दृष्टिकोनांतून उपलब्ध काव्यसमीक्षकांमधला आजमितीस तरी आद्य मानावयास हवा, असा 'काव्यालंकार' कार भामह याच्या ग्रंथाचा साक्षेपी अभ्यास करून त्यांनी आपला नवीन साहित्यिक प्रबंध 'शैलीशास्त्रज्ञ भामह' हा संस्कृत-मराठी रसिक-समीक्षकांच्या हातात ठेवला आहे. ग्रंथाचं नाव सुटसुटीत असावं, म्हणून 'शैलीशास्त्रज्ञ भामह' एवढंच निदर्शिलं असलं, तरी 'भारतीय काव्यशास्त्राचा प्रतिष्ठापक' (पृ.२३८), 'भारतीय शैलीशास्त्राचा प्रवर्तक' (पृ. २३९), 'काव्यशास्त्रीय ग्रंथलेखनाच्या पद्धतीचा आदर्श वस्तुपाठ' (पृ. २३६) घालून देणारा लेखक, अशा अनेकविध दृष्टिकोनांतून महत्त्वाचा व म्हणून मानार्ह ठरणारा भामह त्यांना लेखनातून अभिप्रेत आहे. मम्मट, आनन्दवर्धन, जगन्नाथ या काव्यसमीक्षकांना पुरेसा न्याय मिळाला, पण भामहाची त्याच्या योग्यतेनुसार दखल घेतली गेली नाही; अशा काहीशा भावनेतून डॉ. वा.के.लेले यांनी भामहाविषयी तळमळीनं, रसरसून, पण कोठेही न्यायबुद्धी न सोडता लिहिलं आहे. आपल्या सयुक्तिक, सोदाहरण, सविस्तर व साक्षेपी चर्चेचे निष्कर्ष त्यांनीच वाचकांच्या सोयीसाठी अकराव्या 'उपसंहार' प्रकरणात केवळ चार पानांच्या मजकुरात सादर केले आहेत. एवऱ्हच अभ्यासविषय झालेल्या भामहाइतकाच ग्रंथलेखनपद्धतीचा





अनुक्रमणिका

आदर्श, अभ्यासक डॉ. लेले यांनीही घालून दिला आहे. काव्यसमीक्षकांमधला आद्य व एक उत्तम काव्यसमीक्षक म्हणून भामहाचा गौरव याआधी कोणीच केला नाही, असं नाही. उलट, ज्या ज्या अधिकारी व्यक्तीनं भामहाविषयी लिहिलं, त्या त्या व्यक्तीनं भामहाचं गुणगानच केलं आहे. सुशीलकुमार दे (History of Sanskrit Poetics,Calcutta 1960, p. II. 32.) म्हणतात, "In Bhamaha's Kavyalamkara the different topics of poetics are formulated not incidentally, as Bharata, but in such well-defined outline..." 'भामहाने अलंकारशास्त्राचा ऊहापोह व्यवस्थित व मुद्देसूदपणे केला आहे.' असा अभिप्राय भामहावर संस्कृतिकोशात नोंद करणाऱ्या ('प्राचीन- भारतीय-संस्कृती-कोश' सं. महादेवशास्त्री जोशी) विद्वानानं व्यक्तवला आहे. श्री. रमणकुमार शर्मा यांच्या हिंदीतील काव्यालंकाराच्या (दिल्ली, १९५५) आवृत्तीला 'शुभाशंसा' लिहिताना प्रा. डॉ. ब्रजमोहन चतुर्वेदी यांनी 'काव्यालंकारा' ला 'भारतीय साहित्यशास्त्राचं मानससरोवर' (पृ.५) म्हणून गौरवलं आहे. नंतरकालीन संस्कृत काव्यसमीक्षकांनी, भवभूतीनं वाल्मीकींना पूर्वकवी म्हणून गौरवलं (इदं कविभ्य : पूर्वेभ्यो नमोवाकं प्रशास्महे। उत्तररामचरितम् १.१ अआ.) तसंच भामहाला पूर्वसूरी म्हणून आदरलं आहे. (पूर्वेभ्यो भामहादिभ्य : सादरं विहिताञ्जलिः । विद्याधरकृत एकावली १. अआ.) इतरही लेखक भामहाच्या स्तवनात मागे राहिले नाहीत. मी बुद्ध्याच इंग्रजी (दे), मराठी (विश्वकोश), हिंदी (चतुर्वेदी) व संस्कृत (विद्याधर) असे चार भाषांतील अभिप्राय नोंदवले आहेत. पण डॉ. वा.के. लेले यांनी ज्या रीतीनं शैलीविज्ञान व तंत्रयुक्ती या दृष्टिकोनातून भामहाच्या विचारांची व मांडणीची परीक्षा करून त्यास आपल्यापरीनं न्याय दिला, तो मात्र आजवर इतर कोणी दिला नव्हता.

डॉ. लेले हे 'हर्षनिर्भर' होऊन वारेमाप स्तुती करत सुटणारे समीक्षक नव्हेत. तोलून-मापून 'न्याय' देणारे 'प्राश्निक' आहेत. भामहाची उपेक्षा झाली, म्हणून नाही, पण त्याच्या योगदानाची सम्यक् समीक्षा अभियुक्तांकडून होत नव्हती, म्हणून डॉ. लेले यांनी एवढं विस्तृत व अभिनव दृष्टिकोनातून विवेचन केलं. तंत्रयुक्तीच्या परिशीलनानं विशुद्ध झालेल्या त्यांच्या निकषपद्धतीवर जिथं कुठं भामह सदोष वाटला, तिथे त्यांनी त्याची सदोषताही परखडपणानं दाखवून दिली आहे. मेघ, वायू, चंद्र, भुंगा, चक्रवाक, पोपट अशांना दूताचं काम करायला लावणं भामहाला योग्य वाटत नाही. अशा दूतांना विषय करून लिहिलेली काव्यं त्याला सदोष वाटतात. या विचारसरणीनं मेघदूतासारखी उत्तम काव्यरत्नं गारेच्या मोलाची ठरायची! यासंबंधीचा पूर्ण ऊहापोह करून (पृष्ठं १२१-१२४) 'एकंदरीने 'अयुक्तिमत्' दोषाविषयीची भामहाची विचारसरणी प्राचीन भारतीय परंपरा, लोकसमजुती, काव्यदृष्टी आणि रसिकता यांपैकी कोणत्याही कसोटीने ग्राह्य ठरत नाही.' (पृ.१२४) असा स्वच्छ निर्णय डॉ. लेले यांनी दिला. भामहाचं प्रतिज्ञाभासाचं विवेचनही त्यांना

पटत नाही (पृ.१६७). डॉ. लेले यांचा निःपक्षपातीपणा पारदर्शी आहे. मात्र मी स्वतः कदाचित इतक्या कडक शिस्तीचा नसल्यामुळं मला एखाद्या ठिकाणी (ही ठिकाणं खरंच फार मर्यादित आहेत.) डॉ. लेले काहीसे न्यायकठोर वाटतात. उदाहरणार्थ, 'भामहाच्या विवेचनात विविध विषयांची क्रमबद्धता, स्थानयोग्यता व निश्चितता यांचा अभाव' (पृ.८) त्यांना जाणवतो. तसं घडून येण्यास काही सबळ व स्वाभाविक कारणं आहेत, हे ते स्वतःच सांगतात. भामह हा काव्यशास्त्राच्या प्रारंभिक युगातील शास्त्रकार होता. त्या युगात भारताच्या निरनिराळ्या प्रदेशांतील विचारवंत निरनिराळ्या संकल्पना जिज्ञासूंच्या समोर मांडत होते व ही मांडणी प्राथमिक व प्रायोगिक अवस्थेत असल्याकारणानं तिला अद्यापि सुव्यवस्थित रूप प्राप्त झालं नव्हतं. भामह हा आधी मांडले गेलेले विचार, त्याच्या काळात मांडले जात असणारे विचार आणि त्याला सुचलेले विचार हे सर्व आपल्या ग्रंथात संकलित करत होता; आणि 'म्हणूनच त्याच्या ह्या संकलनात सहजच विस्कळितपणा उतरला आहे.' (पृ.८) हे सर्व स्वतःच प्रतिपादून झाल्यावरही डॉ. लेले यांना दे यांचे भामहाचे प्रशंसापर उद्‌गार केवळ 'अर्थवादा' त्मक वाटू लागतात, याचं आश्चर्य वाटतं. डॉ. दे म्हणतात (त्यांच्या उद्‌धरणाचा वर आलेला पृष्ठ-निर्देश पाहावा.)

"In Bhāmaha's Kāvyālaṁkāra the different topics of poetics are formulated not incidentally, as in Bharata, but in such well-defined outline as would indicate that the Alaṁkāra-śāstra had already attained the rank of an independent discipline.' यापुढे जाऊन डॉ. लेले दे यांच्या शब्दयोजनेतील भरताचे विचार incidental होते, भामह हा intrinsic वा pertinent आहे आणि त्याच्या काळात काव्यशास्त्राला एका स्वतंत्र ज्ञानशाखेची प्रतिष्ठा प्राप्त झाली होती, अशा स्वरूपाची दे यांची निरीक्षणं बहुतांशी पटण्याजोगी आहेत, हेही मान्य करतात. 'परंतु तरीही भामहाच्या ग्रंथाची रूपरेखा well-defined म्हणजे आखीव-रेखीव आहे, हा दे यांचा दावा मान्य करण्यासारखा नाही' (पृ.८), असं म्हणतात. मला हे थोडं अनाठायी सूक्ष्म वाटतं. दे यांचं विधान ज्या संदर्भात आलं आहे, तो संदर्भ भामहाच्या आधीचा भरतादिकांमध्ये आढळणारा काव्यशास्त्रीय विचार व 'भामहात' येणारा काव्यशास्त्रीय विचार यांच्या तुलनेचा आहे. भामहाच्या विचारांत incidentallity नाही; बोधपूर्वक संगती आहे, ह्याकडे दे यांचा रोख आहे. प्रत्यक्ष ग्रंथातल्या मांडणीतील मागे-पुढेपणा, अव्यवस्थितपणा वा विस्कळितपणा हा त्यांना फारसा अभिप्रेत नसावा असं वाटतं. Thematic Presentation त्यांना अभिप्रेत असावं. खरं तर, तंत्रयुक्त्या व शास्त्रादेश हेही तत्त्वसूचक असावेत, त्यांतील तत्त्वांचा लवचिकपणानं स्वीकार हा अभिप्रेत असावा; ठोकळेबाजपणाचा (Wooden framework) आग्रह नसावा, अशी माझी धारणा आहे. भामहाच्या मांडणीचे दोन भाग करून, १. मनात अभिप्रेत असलेली तार्किक मांडणी व २. लेखनात काहीसं पुढं-मागं होऊन झालेली मांडणी, अशा प्रकारे फरक

करावा, असं मला वाटतं. काव्यालंकार हा 'रचनादृष्ट्या काहीसा अव्यवस्थित' असल्याचं डॉ. लेले यांनी कितीही सप्रमाण (पृ.८) दाखवून दिलं, तरी दे यांचे काव्यार्थांच्या सुलक्षिततेविषयीचे उद्गार अर्थवादात्मक मानायचं मला कारण वाटत नाही. काही एक वाक्यं गेल्यानंतर डॉ. लेलेच म्हणतात, भामहानं 'निरूपणाची जी एक पद्धत अंगीकारली, ती उत्तरकालीन ग्रंथकारांनीही पत्करली.... अ प्रकारे भामहाने काव्यशास्त्रीय चर्चेच्या पद्धतीची एक घडी बसवली व उत्तरकालीनांसमोर एक आदर्श ठेवला. त्याचं हे कार्य भारतीय काव्यशास्त्राच्या विकासक्रमात महत्त्वपूर्ण आहे' (तेथेच) हे खरं! आणि तितकंच 'काव्यशास्त्रीय ग्रंथलेखनाच्या पद्धतीचा आदर्श वस्तुपाठ भामहानेच घालून दिला' (पृ.२३६) हेही खरं! आणि हे दोन्ही खरं असलं, तर दे यांच्या 'Well- defined outline' ला एवढा आक्षेप का? डॉ. लेले यांच्या सूक्ष्मतेबद्दल, अचूकपणाबद्दल मला आदर आहे अन् म्हणूनच असं वाटतं, की त्यांनी त्यांच्या स्वतःसच जखडणाऱ्या कडक शिस्तीतून अन् शिस्तीतून थोडं मोकळं व्हावं.

लेखनाला विस्कळितपणा कसा असावा, याचा मासला आपदेवाच्या 'मीमांसान्यायप्रकाश' (आपदेवी) या ग्रंथातून मिळतो. मंगलाचरण झाल्यावर, 'अथातो धर्मजिज्ञासा' हे जैमिनीचं मीमांसाशास्त्राचं पहिलं सूत्र उद्धृत करण्यात येतं. धर्माचा 'चोदना' किंवा 'प्रवर्तना' म्हणजे 'प्रेरणा' किंवा 'भावना' हा अर्थ स्पष्ट करण्यात येतो. मग भावनेचे 'शाब्दी' व 'आर्थी' हे भेद सांगण्यात येतात. 'शाब्दी' भावनेची चर्चा सुरू होते. तिचे साध्य, साधन व इतिकर्तव्यता हे तीन अंश सांगण्यात येतात. 'शाब्दी' भावनेची इतिकर्तव्यता अर्थवादांनी होते, है सांगण्यात आल्यावर अर्थवादांना वेदात अर्थवत्त्व आहे, हे सांगताना वेदचर्चा सुरू होऊन 'स च वेदः विधि- मन्त्र- नामधेय-निषेध-अर्थवाद-भेदात् पञ्चविधः' असं म्हटल्यावर क्रमशः या पाचांचीही पूर्ण चर्चा होऊन ग्रंथ समाप्तीस येतो आणि मग एकदम प्रस्तुतमनुसरामः असं म्हणून आर्थी भावना जी (भांडारकर संस्थेची आवृत्ती) पृ.१६ वर उल्लेखिलेली असते, तिची चर्चा पृ.२६६ वर पुन्हा सुरू होते. म्हणजे शाब्दी व आर्थी या भावनाभगिनींमध्ये तब्बल २५० पृष्ठांचं अंतर पडतं. या पाळणा- लांबणीस आमचे डॉ. लेले काय म्हणतील? असो. महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे याचं एक उद्धरण पृष्ठ ४ वर देण्यात आलं आहे. पंडिती शिस्तीला धरून त्यातील 'reveals' या पदानंतर डॉ. लेले यांनी कंसांत(sic) असं योग्यचं लिहिलं आहे. पण त्याच ठिकाणी एखादी तळटीप देऊन नेमकी कोणती शब्दरचना पितृतुल्य डॉ. काणे यांना अभिप्रेत असावी, हेही डॉ. लेले यांनी एखाद्या विनीत पुत्राच्या हक्कानं म्हणा किंवा कर्तव्यानं म्हणा, सांगायला काय हरकत होती? उद्धरण जसंच्या तसं द्यावं, हे मात्र मान्य.

पण मी स्वतः काहीसा 'स्याद्वादी' असल्यानं डॉ. लेले यांची कडक शिस्तही मला आवडत नाही, असं नाही. त्यांची लेखनशैली, शब्दयोजना मला निश्चितच आवडते. deviant साठी त्यांनी वापरलेला 'वि-चलित' (पृ.५५) हा शब्द, विपथित





अनुक्रमणिका

(पृ.२३७) हा शब्द व एकंदरीत त्यांची नव्यशब्दघटना (neologisms) मला सुयोग्य वाटते. 'कर्णकटू' या अर्थानं वापरलेला 'रटमटीत' हा शब्द (पृ.५८) त्याच्या जुनेपणामुळे आवडतो, तर हरदासी धाटणीचे म्हणा किंवा अव्वल इंग्रजीतल्या पंडिती थाटाचे म्हणा, 'एतावता' (पृ.२८, २३९ व इतरत्रही) आणि 'एवं च' ('एवञ्च' हा परसवर्ण अधिक बहार आणता!) असे वाक्प्रयोगही शैलीदार वाटतात. 'लहान-सहान' असे एकार्थी जोडशब्द मराठीत विपुल आहेत; पण कॅन्ट ज्यांना antinomies म्हणतो, असे 'लहान-महान', 'पूर्णापूर्ण' 'उक्त-सूचित' अशी खऱ्या अर्थानं संभवणारी 'द्वंद्वं' ते फ़ारच सुंदर रीतीनं योजतात. (पाहा पृ. १३६)

काही बारीक-सारीक बाबींबाबत विमती प्रकट करायचीच झाली, तर पृ. ५८ वर भामहानं 'निरर्थक' म्हणून उदाहृत केलेल्या 'डित्थ' वगैरे अर्थहीन शब्दांच्या बाबतीत डॉ. लेले यांनी दिलेली पुस्ती. 'अशिक्षितांत प्रचलित असलेली धोंडिराम, दगडूबाई, इत्यादी व्यक्तिनामे ह्याच वर्गात मोडतात.' असे ते म्हणतात. वस्तुतः दृष्ट लागू नये, म्हणून मुद्दामच हीनतादर्शक नांव देण्याची प्रथा होती, हे सर्वविदित आहे. हे प्रयोजन असल्यानं आपाततः निरर्थक असलेलीही पदं सार्थ ठरतात. कन्नडमध्येही कल्लप्प (कल्लु-दगड), इंग्रजीत पीटर (सं. प्रस्तर, दगड), जर्मनमध्ये (Einstein - एक धोंडूमामा) आणि संस्कृतात शैल-जा (पार्वती-पर्वताची-दगडी) हे असेच संस्कृतिसंबद्ध म्हणा, निरर्थ म्हणा किंवा सार्थ म्हणा, नामप्रयोग आहेत.

पृ. ६० वर 'वेदवाङ्मयात वापरले जाणारे शब्द अभिजात ललित साहित्यात वर्ज्य ठरतात' हे भामहाचं (६.२७) म्हणणं मांडताना मी डॉ. लेले यांच्याकडून काही टीका-टिप्पणीची अपेक्षा बाळगत होतो. काही वेळेला आजच्या मराठीत ज्याप्रमाणे आपण यादवकालीन ज्ञानेश्वरीतील शब्द आवडीनं वापरतो (उदा., संस्कृतनिष्ठांची मांदियाळी घेऊन आम्ही कुरुक्षेत्री गेलो.) तशी लहर कालिदासादिकांनाही येते. मला असे प्रयोग फार आवडतात. नव्या भाषेला पुराणा साज चमत्कृतिजनक वाटतो, वेदांविषयी आस्था-भान दाखवणारा वाटतो. कुमारसंभवात कालिदासानं बुद्ध्याच शतरुद्रियातील 'त्रियम्बकं' हा शब्द वापरला आहे. 'त्रियम्बकं संयमिनं ददर्श' (३.४४). हा शब्द अपाणिनीय वाटला, तर त्याच्याजागी सहज 'त्रिलोचन' हा शब्द वापरून वृत्तही अ-बाधित ठेवता येईल. पण मल्लिनाथ गुरकावतो, 'अत्र केचन साहसिकाः त्रिलोचनं इति पेठुः।... निरङ्कुशा हि कवयः' मला कालिदासाचं 'निरङ्कुशत्व' नाही-तर 'कवित्व', 'वैचित्र्य' जाणवतं. 'प्रभ्रंशयां यो नहुषं चकार'... (रघु १३.३६) हे आणि अशा प्रकारचे इतरही त्याचे वैदिक प्रयोग वेदकाळची झुळूक अनुभवाला आणतात. 'कुरर' हा 'क्रौञ्च' असावा का, असं प्रश्नचिन्ह डॉ. लेले यांनी उपस्थित केलं आहे (पृ.१६९). तपासायला हवं, पण माझ्या समजुत्यनुसार कुरर म्ह. टिटवा व कुररी, म्ह. टिटवी. (पाहा, 'चक्रन्द विग्ना कुररीव भूयः। रघुवंश. १४.६८) पृ. १८३ वर 'खिस्तपूर्व सहाव्या शतकात गौतम

बुद्धाने मागधी भाषेत व महावीराने अर्धमागधी भाषेत धर्मोपदेश केला...' इत्यादी विधानं हे सामान्य समजास अनुसरून केलं आहे. या विषयाची चर्चा तिथं प्रामुख्यानं अभिप्रेत नाही. यामुळेच डॉ. लेले यांच्या विधानाविषयी विमती प्रकट करणं हा माझा हेतू नसून, जो सामान्य समज त्यांनी मांडला आहे, त्याविषयी दुरुस्ती सुचवणं एवढंच मला अभिप्रेत आहे. खरं तर, एवढंच सांगितलं, तरी चालेल, की 'पालि' ही आजमितीस उपलब्ध असलेल्या स्वरूपात कधी काळी 'जनभाषा' होती, की नव्हती, याविषयी विद्वानांत फार मतभेद, संशय आहेत. महावीर हा गौतमाचा ज्येष्ठ समकालीन; तो अर्धमागधीत बहुतांशी त्याच प्रांतातील अन् त्याच लोकांना धर्मोपदेश करतो अन् गौतम मात्र पालीत धर्म सांगतो, हे पटण्याजोगे नाही. आपली शालेय पाठ्यपुस्तकं या दृष्टीनं सुधारून लिहायला हवीत. (हा प्रयत्न मी स्वतः करत आहे, थोडं-बहुत साधलंही आहे.)

डॉ. वा.के.लेले यांनी या एकूण २५४ पानांच्या पृष्ठांत पुरेशी चर्चा करून भरपूर संशोधनात्मक निष्कर्ष सादर केलेत. कांही गोष्टी त्यांनी अनावश्यक म्हणून टाळलेल्या दिसतात. भामहाविषयी एक तर फार ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाही. जी आहे, ती डॉ. लेले यांनी त्यांच्याच 'भाषा, साहित्य व शास्त्र' या ग्रंथात काही प्रमाणात, तर प्रस्तुतच्या ग्रंथांत त्याहून अधिक प्रमाणात, पण संक्षेपात दिली आहे. इतर अनेकजणांनी (डॉ. काणे, दे, बटुकनाथ शास्त्री व बलदेव उपाध्याय, नरसिंहाचार, नोबेल, पाठक, शर्मा, याकोब, इत्यादी) त्याच त्याच संदर्भांच्या आधारे आपापली मते आपापल्या परीनं व सुसंगत रीतीनं मांडली असल्यामुळे या ऐतिहासिक स्वरूपाच्या प्रश्नात फार नवीन मुद्दे व पुरावे नसताना आपणांस उतरण्याचं कारण नाही, या भूमिकेतून जर डॉ. लेले यांनी त्या गोष्टींची फार चर्चा केली नसेल, तर ते योग्यच म्हणायचं! आवश्यक उल्लेख मात्र त्यांनी कोठेच टाळले नाहीत. सविस्तर चर्चेसाठी ठायी ठायी ग्रंथांचे निर्देश केले आहेत. पण एवढं सर्व मान्य करूनही भामहाच्या काश्मीरीपणाबद्दल ग्रंथात कुठंच चर्चा न करता एकदम मलपृष्ठावर मात्र '...काश्मीर प्रदेशात भामह... होऊन गेला' हा निर्देश आकस्मिक वाटतो, एवढं नोंदवायला हवं. ग्रंथ व त्यांच्या लेखकांच्या नावांच्या नोंदी त्यांनी सूचीत दिल्यात. विषयांची सूची मात्र पुढील आवृत्तीत (ती नक्कीच निघणार!) अवश्य द्यावी. यामुळं संदर्भ हुडकणं सोपं जातं. मुद्रण व अक्षरजुळणी फारच चांगली असल्यानं 'शुद्धि-पत्र' देण्याची गरज त्यांना भासली नसणार. अशुद्ध खरंच फार कमी आहे. मला तर पृ. ६७ वरल्या पहिल्या ओळीत पहिला शब्द तेवढा अशुद्ध दिसला. शब्दोक्ति ऐवजी शदोक्ति झालं आहे, एवढंच.

यानंतर मी येथे कांही विचारांचं केवळ सूचन करतो. ते डॉ. लेले यांच्या प्रस्तुतच्या पुस्तकाविषयी नसून, त्यात चर्चिलेल्या विषयाच्या निमित्तानंच केवळ

आहे, हे समजून घ्यावं.

१. भामहाच्या बौद्ध असण्याविषयी उलटसुलट सप्रमाण बहुविध चर्चा झाली आहे. त्याच्या पित्याचं नाव 'रक्रिलगोस्वामिन्' होतं, म्हणून तो बौद्ध होता आणि नमनातलं 'सार्व' हे पद शंकरवाचक ठरतं, म्हणून तो वैदिक होता. त्यानं अपोहवाद स्वीकारला नाही, म्हणून तो बौद्ध नसला पाहिजे आणि त्यानं 'स्फोटवाद' नाकारला, म्हणून तो वैदिक नसला पाहिजे, अशा स्वरूपाच्या वहीच्या पानाला समासाजवळ मुडपून त्याचे वैदिक व बौद्ध असे दोन भाग करून मुद्दे लिहिणं मला परिपक्वतेचं वाटत नाही; शाळकरी वाटतं. सांगायचा मुद्दा असा, की भाषाशास्त्र, शैली, इत्यादी धर्मनिरपेक्ष विषयांच्या बाबतीत स्वतंत्र बुद्धीचा माणूस वैदिक-हिंदूधर्मी विचार वा बौद्धधर्मी विचार अशा दृष्टिकोनातून विचारांचा स्वीकार वा त्याग करणार नाही. 'ध्वनिमाधुर्यानं श्रेष्ठ ठरायला काव्य म्हणजे काही संगीत नाही', इतक्या तडफेनं विचार मांडणारा भामह स्वतःला अपोहवादी बौद्ध जाळ्यात किंवा स्फोटवादी वैदिक जाळ्यात गुरफटून घेईल, याचा संभव कमी आहे. गौडी आणि वैदर्भी अशा भेदातही त्याला 'अधरोत्तरता' स्वीकारायची नाही. स्वतःचे विचार स्वतःच करायचे आहेत. तरीदेखील इ. स. पू. सहाव्या- पाचव्या शतकांपासून ते इ. स. पाचव्या-सहाव्या शतकांपर्यन्त जे बौद्ध विचारांचं नवीन वारं आलं होतं, ते अनेकांनी दुःषन्तानं मध्याह्नी मालिनी तीरावरून आलेलं भिजलेलं गार वारं कवटाळलं (शाकुं ३.६), तसं 'आलिंगलं' होतं. बौद्धवाद हा एक परीनं योगमार्गाचंच आविष्करण होतं. पाहा - Der ganze Buddhismus ist durch und durch nichts als Yoga ( H. Bech. Buddismus. II. II) काव्यनिर्मितीला जी 'समाधी' आवश्यक असते, तिचा संबंध योगाशी आहे. 'नानृषिः कविरित्युक्तं ऋषिश्च किल दर्शनात्' ही जी भट्टतौतांची सर्वथैव समर्पक उक्ती आहे, ती योगी द्रष्ट्याविषयी आहे. समाधी या एकाग्रचित्ततेची भरत (१६.९७), वामन (३.१) यांनी जी व्याख्या केली आहे, ती योगपर आहे. वामनाचीची अर्थगुणसमाधी (३.२.६) आणि त्याचं स्पष्टीकरण 'समाधिकरणत्वात् समाधिः। अवहितं हि चित्तमर्थान् पश्यति'। हे सर्व योगविचार बौद्ध पालि तिपिटकांत व संस्कृत बौद्ध आगमांमध्ये वारंवार येतात. रात्रीच्या पहिल्या प्रहरात, दुसऱ्या प्रहरात व तिसऱ्या प्रहरात बौद्ध भिक्षू काय काय आध्यात्मिक संपदा प्राप्त करतात, याची वर्णनं आणि डॉ. लेले यांनी प्रसंगतः पृ. ५५ वर उद्धृत केलेले फ्रेंच साहित्यिकाचे उद्गार 'I live just like a monk' हे एकमेकांशी फार जवळीक साधतात. माझ्या Some Aspects of (Buddhist) Literary Criticism (१९७५) या (इतर कोणत्या दृष्टीनं संपन्न नसली, तरी मुद्रणदोषांनी 'संपन्न' असलेल्या) पुस्तिकेत मी अनेक मुद्दे सूचित करण्याचा प्रयत्न केला आहे. ते जिज्ञासूंनी अवश्य पाहावे.

२. शब्दांची निवड व त्यांमागील प्रेरणा (पृ.५०) यासंबंधीदेखील भांडारकर इन्स्टिट्यूटनं प्रकाशित केलेल्या माझ्या 'Synonymic Collocations in the Pali

Tipitaka : A Study' या ग्रंथात पालीतील व पाश्चात्त्य विचारसरणींतीलही या विषयीच्या (समानार्थी शब्दयोजना शैलीच्या) अनेकविध पैलूंची चर्चा केली आहे.

३. 'ललितलेखन व शैली' (१९८४) या आपल्या ग्रंथात पृ. २०४ वर फ्लॉबर्ट यांनी style ची केलेली व्याख्या 'style is the writer's own way of thinking or seeing' ही वाचली की 'style' या धारदार कठोर उपकरणाचं नाव भाषेतील लवचिक आत्माविष्कारी पद्धतीला पडावं, याचं नवल वाटत राहाणार, हे निश्चितच. style साठी वापरला जाणारा 'शैली' हा शब्द यौगिकार्थानं जाणून घेतला, तर कदाचित तोच अधिक समर्पक वाटेल. 'शीले भवा शैली। समाधानपूर्विका प्रवृत्तिः' -विस्तारासाठी माझी वर निर्देशिलेली पुस्तिका (Buddhist Literary Criticism. पृ . 87) पाहावी.

एक उत्तम संशोधनात्मक ग्रंथ रसिक-वाचकांना सादर केल्याबद्दल माझे ज्येष्ठ व श्रेष्ठ स्नेही प्रा. डॉ. वा.के.लेले यांचे अनेकवार अभिनंदन आणि त्यांचे बरोबरच मुद्रक व प्रकाशक श्री. रवीन्द्र कुलकर्णी यांचेही!

संस्कृत-प्राकृत विभाग, फर्गसन महाविद्यालय, पुणे 411004.



# साहित्य अकादेमी

## प्रादेशिक कार्यालय

१७२ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग, दादर (पूर्व), मुंबई - ४०० ०१४
फोन : ४१३ ५७ ४४ फॅक्स : ०९१-२२-४१४७६५०

## महत्त्वपूर्ण मराठी प्रकाशने

### कांदबरी

सात पाऊले आकाशी (गुजराती कादंबरी) ९०/-
कुंदनिका कापडीआ, अनुवादिका : उषा पुरोहित
लोकांचे राज्य (आसामी कादंबरी) ११०/-
वीरेंद्रकुमार भट्टाचार्य, अनुवादिका : शांता ज. शेळके
जा ओलांडुनी (कन्नड कादंबरी) १००/-
सन्तेशिवरा लिंगण्णैया भैरप्पा, अनुवादिका : उमा कुलकर्णी
सहा बिघे जमीन (उडिया कादंबरी) २५/-
फकीर मोहन सेनापति, अनुवादक : उमाकांत ठोमरे
बंड (कन्नड कादंबरी) ८०/-
व्यासराय बल्लाळ, अनुवादिका : मीना वांगीकर
कार्मेलीन (कोंकणी कादंबरी) ६५/-
दामोदर मावजो, अनुवादक : नरेश कवडी
अमृत आणि विष (हिंदी कादंबरी) १८५/-
अमृतलाल नागर, अनुवादिका : उर्मिला जावडेकर
शेजारी (मल्ल्याळम कादंबरी) ४०/-
पी. केशवदेव, अनुवादक : उमाकांत ठोमरे
अंतराळातील स्फोट (वैज्ञानिक कादंबरी) ३०/-
जयंत वी. नारळीकर
अशी धरतीची माया १७५/-
(कन्नड कादंबरी-दुसरी आवृत्ती), शिवराम कारंथ
अनुवादक : रं. शा. लोकापूर

### एकांकिका

निवडक मराठी एकांकिका १६०/-
(दुसरी आवृत्ती),
संपादक : रत्नाकर मतकरी ● सुधा जोशी

### ललित लेखन

माणुसकीच्या ज्योती ६०/-
झवेरचंद मेघाणी, अनुवादक : अच्युतभाई देशपांडे
वा. म. जोशी साहित्य-दर्शन ४०/-
संपादक : वा. ल. कुलकर्णी, गो. म. कुलकर्णी

अलबेरुनीचा भारत (खंड पहिला) ३०/-
अनुवादक : यू. म. पठाण
निवडक चिं. त्र्यं. खानोलकर १५०/-
संपादक : रविंद्र घवी
बाळ सीताराम मर्ढेकर (दुसरी आवृत्ती) ६५/-
यशवंत मनोहर
निवडक पु. भा. भावे (दुसरी आवृत्ती) १५०/-
संपादक : वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे, राम शेवाळकर
विनोबा सारस्वत (दुसरी आवृत्ती) ११०/-
संपादक : राम शेवाळकर
निवडक श्री. के. क्षीरसागर १६५/
संपादक : व. दि. कुळकर्णी
निवडक मराठी आत्मकथा १४०/-
संपादक : राम शेवाळकर
जवाहरलाल नेहरू १२५/-
एस. गोपाळ, अनुवादक : पुरुषोत्तम आत्माराम चित्रे
निवडक बी. रघुनाथ ७०/-
संपादक : नागनाथ कोत्तापल्ले

### कविता

तृणपर्णे १५/-
वॉल्ट व्हिटमन, अनुवादक : सदानंद रेगे
स्वातंत्र्य लढ्यातील कवने ८५/-
संपादक : राजा मंगळवेढेकर
मुक्तिबोधांची निवडक कविता १८५/-
संपादक : यशवंत मनोहर
पु. शि. रेगे यांची निवडक कविता १६०/-
संपादक : प्रकाश देशपांडे
स्वातंत्र्योत्तर मराठी कविता (१९६१-८०) १५५/-
संपादक : तु. शं. कुलकर्णी
आधुनिक स्तोत्रं ३५/-
निस्सिम एझिकिएल, अनुवादक : प्रदीप गोपाळ देशपांडे
रविकिरण मंडळाची निवडक कविता ४५/-
संपादक : अनुराधा पोतदार, वसंत कानेटकर

## पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डर कूपनवर किंवा चेक सोबतच्या चिट्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

## परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.






